माणिकचन्द्र जैनग्रन्थमालायाः षट्त्रिंशतमो ग्रन्थः

पण्डितप्रवराशाधरविरचितम्

# त्रिषष्ठिस्मृतिशास्त्रम्

श्रेष्ठि हीराचन्द्र तनुजेन मोतीलालेन
सम्पादितं संशोधितं च

' मूल्यं अष्ट आण्यक '

# निवेदन.



पण्डितप्रवर आशाधर विक्रम की तेरहवी सदीके उत्तरार्थ और चौदहवी सदीके प्रारम्भमें एक असाधारण विद्वान् हो गये है। उनकी प्रतिमा सर्वतोमुखी थी। न्याय, व्याकरण, काव्य, साहित्य, धर्मशास्त्र, वैद्यक आदि विविध विषयोंपर उनका अधिकार था। वे 'भवाङ्गभोगेषु निर्विण्ण' ओर 'दुःखमीलक' थे. फिर भी उन्होंने गृहस्थ रहते हुए ही स्वपर कल्याण में प्रवृत्त रहना पसन्द किया। यद्यपि उन्होंने निर्ग्रन्थमुनिलिङ्ग धारण न किया, फिर भी अनेक मुनियासे भी अधिक जैनधर्मकी सेवा और प्रभावना की।

ऐसा जान पडता है कि वे अपने समय के सब से बडे विद्वान् थे और शायेद दिगम्बरसप्रदायमें उनके वाद उनकी जोडका तत्वस्पर्शी विद्वान् कम से कम ग्रन्थकर्ता तो दुर्मीलही है। उनके पास अनेक मुनिभट्टारकोंने और दुसरे अजैन विद्वानोंतकने ग्रन्थाध्ययन किया।

वे अपने वाद विविध विषयोंका विशालसाहित्य छोड़ गये है। जिसका उल्लेख उनके अनेक ग्रन्थोंकी अन्त्यप्रशस्तियों में मिलता है। परन्तु उसका अधिकाश अभीतक अप्रकाशित है और बहुतसे महत्वपूर्ण ग्रन्थौका तो अभीतक पताही नही चल रहा है। भरताभ्युदयचम्पू, राजीमतीविप्रलम्भ (काव्य) अष्टाङ्गहृदयोद्योतिनी (वाग्भटके सुपसिद्ध वैद्यकग्रन्थकी टीका), धर्मामृतकी पञ्जिका टीका, प्रमेयरत्नाकर (न्याय), अध्यात्मरहस्य, अमरकोप टीका, रुद्रटके काव्यालकार की टीका, आदि ऐसेही ग्रन्थ है जिनका अभीतक कहीं पता ही नहीं लगा है और दुःखकी बात है कि लगानेका कोई प्रयत्न भी नही किया जा रहा है।

यह 'त्रिषष्टिस्मृतिशास्त्र' सुलभ होनेपर भी अभीतक अप्रकाशित था। यह भगवज्जिनसेन और गुणभद्रस्वामीके महापुराणका सार है। और 'जाजाक' नामक पण्डितकी प्रार्थना और प्रेरणासे नित्यस्वाध्याय करने के लिए रचा गया था। इसके पाठसे महापुराणका सारा कथाभाग स्मृतिगोचर हो जाता है। इसकी पञ्जिकाटीका टिप्पणी के तौर–पर प्रत्येक पेजके अन्तमें दे दी गई है।

वाराशिव के सुप्रसिद्ध जैनसाहित्योद्धारक और विद्याव्यासङ्गी नवयुवक श्रीयुत सेठ मोतीलाल हिराचन्द गांधीने इसका सुंदर मराठी अनुवाद करके महाराष्ट्रप्रान्तके जैन बन्धुओंका बहुत उपकार किया है। यद्यपि माणिकचन्द्र ग्रन्थमालामें मूल संस्कृत प्राकृत ग्रन्थही प्रकाशित किये जाते हैं परन्तु श्रीयुत मोतीलालजीके इस आग्रहको कि मराठी अनुवाद भी साथमें रहे, हम अस्वीकार न कर सके। यह ग्रन्थ उन्होंने परार्थदृष्टीसेही सम्पादित किया है और इसकी चारसौ प्रतियाँ अपनेही खर्चसे ग्रन्थमालाको अर्पण कर दी हैं। इसके लिए ग्रन्थमालासमिति उनके प्रति अपनी हार्दिक कृतज्ञता प्रकाशित करती है।

नाथूरामप्रेमी
**मंत्री—मा. ग्रं. माला**

---

# प्रस्तावना.



धर्मामृतमयीं वृष्टिंकृत्वा भव्येषु निर्वृतः।
तं पार्श्वताप मूर्च्छांभूमार्या पर्युपास्महे ॥

—पं. आशाधर

जैन समाजात इ. स, च्या सातव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंत मोठे मोठे पडित व राजे होऊन गेले असून त्यानीं सस्कृत वाङ्मयात बरीच भर घातली आहे. या काळानतरचें वाङ्मय मुख्यत्वें करून प्रचलित भाषातून झालेलें आहे व त्या पूर्वीचें वाङ्मय फारसें उपलब्ध नसून जें आहे तें प्राकृत भाषातून आहे. पण वर दिलेल्या काळात जैन पडितानी इतकी उत्कृष्ट ग्रथरचना करून ठेविली आहे कीं, त्यानीं सकृत वाङ्मयात वैदिकावरहि ताण केली असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. जैन पडिताना या काळात राजाश्रय होता व अशा आश्रयाशिवायहि केवळ धर्मप्रेमामुळेंच काहीं पडितानीं वाङ्मय रचना केलेली आहे. सरस्वातिपुत्र आशाधर पडित वरील दोन्ही वर्गांत मोडतात.

पडितजींचा काळ इ स. ११८० ते १२५० पर्यंतचा असावा असें त्यानीं लिहिलेल्या ग्रथावरून वाटतें. त्याचें जन्मस्थान मेवाड राज्यातील माढलगड हें होय. त्याकाळीं या प्रदेशास सणादलक्ष म्हणत. या गावाला एक सरोवर होतें. त्याचें नाव सावर व एक मडलक नावाचा किल्ला होता, व गडाचे जागीं मंडलका नावाची ही विशाल नगरी होती. त्याच्या वडिलाचें नाव सल्लक्षण व मातोश्रीचें नाव श्री रत्नाबाई होते. सल्लक्षण हे राजकारणात बरेंच लक्ष घालित. ह्यामुळें मेवाडचें राज्य इ. स ११९२ मध्यें शाहाबुद्दीनघोरीच्या टोळधाडीस बळी पडल्यावर त्याना स्वरक्षणासाठीं माळवा प्रातात येऊन राहावें लागलें. माळवाप्रातावर परमारवशाचे राजे राज्य करीत होते. राजा भोजनतर उदयादित्य, नरवर्मा, यशोवर्मा, अपवर्मा इतके राजे होऊन गेले. त्यावेळी अजयवर्मा किंवा विन्ध्यवर्मा राज्य करीत होता. विद्वानाचा आश्रयदाता म्हणून भोजराजाची कीर्ति अजून आहे. ती विन्ध्यवर्माचे वेळींहि अखड होती. म्हणूनच त्यानें सल्लक्षणसारख्या विद्वानाला सन्मानपूर्वक आश्रय दिला.

माळवाप्राताची राजधानीं धारानगरीत सल्लक्षण येऊन राहिले तेव्हा आशा-

धराचे वय १०।१२ वर्षांचें होतें पण त्याना महावीरपंडिताकडे जैनेंद्रप्रमाण व जैनेंद्रव्याकरणासारखे ग्रंथ पढण्यास पाठविण्यात आलें. महावीरपंडित हे सुप्रसिद्ध वादिराजपंडित धरसेनाचे शिष्य होते त्याच्याजवळ एक तपपर्यंत आशाधरानीं अध्ययन केल्यावर त्यानीं स्वत. ग्रंथरचनेस प्रारंभ केला. माळवा-धीशाचे पदरीं त्यावेळीं वादीन्द्रविशालकीर्ति, परराष्ट्रमंत्री कविराज बिल्हण, देवचंद्र, मदनोपाध्याय, केल्हण, उदयसेन वगैरे बरेच विद्वद्वर्य होते त्या सर्वांनीं आशाधराच्या विद्वत्तेची मुक्त कंठानें प्रशंसा केलेली आहे बिल्हणने त्याना 'सरस्वति पुत्र' ही पदवी दिली. पंडित उदयसेनानें त्याना कलिकालीदास म्हणून संबोधिलें आहे मदनकीर्तियतीनीं त्याना प्रज्ञापुञ्ज म्हटले आहे त्याची ही सर्वतोमुखी कीर्ति ऐकून देशात राहून अनेक विद्यार्थी त्यांचेकडे निरनिराळ्या शास्त्राच्या अध्यायनार्थ येऊ लागले व इतक्या लहान वयातही सर्वांना आपल्या विषयात त्यानीं पारंगत करून आपला लौकिक वाढविला खाली दिलेल्या श्लोकात याच गोष्टीबद्दलचा उल्लेख आहे

> योद्राग्व्याकरणाब्धि पारमनयच्छुश्रूषमाणान्नकान्
> षट्तर्कीपरमास्त्रमाप्यन यतः प्रत्यर्थितः केऽक्षिपन् ।
> चेरः केऽडस्खालितं न येन जिनवाग्दीपं पथिग्राहित
> प्रीत्या काव्यसुधा यतश्च रसिकेष्वापु:प्रतिष्ठांनके ॥

"पंडित आशाधराच्या शिष्यांपैकीं असा कोण आहे कीं ज्याला त्यानीं व्याकरण महोदधीच्या पैलतीरास अल्पावधींत पोहोंचाविलें नाहीं, असा कोण आहे कीं ज्यानें षट्दर्शनाचें अमोघ शस्त्र हातीं घेऊन प्रतिवादियाना जिंकलें नाहीं, असा कोण आहे कीं आशाधरपंडिताच्या तोंडून जिनवाणी ऐकून तो मोक्ष-मार्गी बनला नाहीं, त्याचप्रमाणे असा कोण आहे कीं, जो त्याच्या मुखातील काव्यामृत पिऊन रसिक पुरुषात प्रतिष्ठा पावला नाहीं." असा वरील श्लोकाचा भावार्थ आहे तात्पर्य हें कीं पंडित आशाधराच्या शिष्यवृंदात मुनिगण, शास्त्रपटु, शास्त्री व पंडित आणि मर्मज्ञ रसिक वगैरे सर्वशास्त्रपारंगत मंडळी होती महान् वैय्याकरणी देवचंद्र, न्यायशास्त्र व षट्दर्शनाभिज्ञ विशालकीर्ति भट्टारक विनयचंद्र व राजगुरु मदनोपाध्याय हे त्याचे शिष्य होत

त्याच्या पश्चात् त्याच्या छाहड नावाच्या पुत्रानेंहि त्याची कीर्ति कायम राखली होती सिंहदेवर्मा गजानंतर सुभटवर्मा गादीवर येऊन त्याचेनंतर अर्जुनवर्मा

गादीवर वसला. हा महान कवि व शास्त्रज्ञ होता. ह्याच्या पदरी वरील सर्व विद्वान् व इतरहि अनेक पंडित होते. छाहडानेंहि आपल्या विद्वत्तेनें राजास खूष केलें. ह्याचे कारकीर्दीत सल्लक्षण होते. ते परराष्ट्रमंत्री होते असे दिसून येते. अर्जुनवर्मा निपुत्रिक वारला. तेव्हा त्याच्या चुलत पणजाचा नातु देवपाळ किंवा साहसमल्ल यास गादी मिळाली. त्याचेनंतर त्याचा मुलगा जयसिंह उर्फ जैतुगिदेव गादीवर वसला. ह्याचे कारकीर्दीतच पं. आशाधरानी सागरधर्मामृत नावाची टीका लिहिली. धारानगरींत असताना त्यानीं पाच राजाच्या कारकीर्दी पाहिल्या.

पंडितजी हे नुसते एका शाखेंतीलच पंडित नव्हते, तर वैद्य, ज्योतिष वगैरे शास्त्रातहि ते पारंगत होते. त्याशिवाय सम्यक्‌धर्मावर त्याचें खरेंखुरें प्रेम होतें. अनेक धर्मग्रंथ लिहून जिनवाणीची सेवा करण्याकरिता केवळ ते धारानगरी सोडून निघाले एवढेंच नव्हें तर जवळजवळ प्रपंच सोडून धार संस्थानातील नालछानगरींत येऊन ते राहिले. त्याकाळीं नालछा गावास नलकच्छपूर म्हणत असत. हल्लींप्रमाणें त्यावेळींहि हें गाव सधन जैन श्रावकानीं मंडित होते असे दिसते एरव्हीं हें गाव आशाधरानी पसंत केलें नसतें. “ श्रीमदर्जुनभूपाळ राज्ये श्रावकसंकुले। जिनधर्मोदयार्थं यो नलकच्छपुर ऽवसत् ” असें म्हटलेलें आहे. ह्यावरून नालछानगरीच का पसंत केली व त्याचा हेतु किती उच्च हें स्पष्ट दिसतें. धन्य त्या महाभागाची ! अशा प्रतिगौतमगणाधरामुळेंच, अजून जिनवाणी ग्रंथरूपानें टिकून राहिली आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. धर्माखातर सर्व हाल सहन करून स्वशक्त्यनुसार शासनसेवा करण्यास आशाधर पंडिताप्रमाणे श्रावक जर तयार होतील तर ह्या पडत्या काळातहि जिनशासनोद्धार झाल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं. नालछाला ते इ. स १२२०–२५ च्या दरम्यान गेले असावे असा अंदाज आहे ह्यानंतर जवळजवळ २॥ तपाचा काळ त्यानी केवळ ग्रंथ लेखनात घालविला.

सध्या आशाधराचे मुख्य तीन ग्रंथ सुलभ आहेत. ( १ ) जिनयज्ञकल्प, ( २ ) सागारधर्मामृत ( ३ ) अनागारधर्मामृत. या तीन्ही ग्रंथात त्यानीं आपली विस्तृत प्रशस्ति लिहिली आहे. वि. संवत् १३०० पर्यंत त्यानी जेवढया ग्रंथाची रचना केली त्या सर्वांची नावें प्रशस्तींत आहेत ते ग्रंथ.

( १ ) प्रमेयरत्नाकर— हा न्यायाचा ग्रंथ पद्यमय आहे.

( २ ) भरतेश्वराभ्युदय— उत्तम काव्य. प्रत्येक सर्गाच्या शेवटीं ‘ सिद्धः ’

शब्द येतो. तो स्वोपज्ञटीकेसह लिहिला हा ग्रंथ सोनागिरांचे भट्टारकाचे भांडारात आहे

( ३ ) धर्मामृतशास्त्र— हा स्वटीकेसह सुंदर लिहिला.

( ४ ) अष्टांगहृद्योद्योतिनी— ही वाग्भटसंहितेची टीका होय

( ५ ) मूळाराधना— भगवती आराधनेवरील टीका नुकतीच उपलब्ध नव्हे प्रसिद्ध झाली आहे

( ६ ) इष्टोपदेश— यावरील टीका

( ७ ) अमरकोषावर क्रियाकलाप नावाची टीका लिहिली.

या ग्रंथाचा उल्लेख जिनयज्ञकल्पाच्या प्रशस्तींत आहे. हे वि. संवत् १२८५ च्या अगोदर रचले गेले यानंतर सं १२९६ पर्यंत सागारधर्मामृताची टीका लिहिपर्यंत खालील ग्रंथ लिहिले

( १ ) रुद्रकवीच्या काव्यालंकारावरील टीका ही सोनागिरचे भांडारात आहे

( २ ) सहस्रनाम स्तोत्र— अरहंतदेवाचें. सर्वत्र उपलब्ध

( ३ ) जिनयज्ञकल्प— सटीक उपलब्ध-प्रसिद्ध

( ४ ) त्रिषष्टिस्मृतिशास्त्र— संक्षिप्त ६३ शलाकापुरुषाचें चरित्र स्वटिप्पणसिह सध्या प्रसिद्ध करीत आहोत

वि सन १२९६ च्या नंतर लिहिलेले ग्रंथ अनगारधर्मामृताच्या टीकेंत आढळतात ते

( १ ) राजीमतीविप्रलंभ नावाचे खण्डकाव्य स्वोपज्ञटीकेसह अनुपलब्ध.

( २ ) अध्यात्मरहस्य— हा वडिलाच्या आज्ञेवरून यानीं लिहिला. योगमार्गावरील शास्त्र

( ३ ) रत्नत्रयविधान— रत्नत्रयविधानरूपूजा व महात्म्याचे वर्णन करणारा ग्रंथ

जिनयज्ञकल्प हा ग्रंथ प्रतिष्ठेसंबधीं होय हा खंडेलवाल वंशाचे भूषणरूप अल्हणचे पुत्र श्रावकधर्मी लवलीन, नलकच्छपूरचे रहिवासी, परोपकारी, देवपूजा पात्रदान व जिनशासन उद्योत करणारे प्रतिष्ठाग्रणी पापासाधूच्या वारवार आग्रहावरून लिहिला व तो अश्विन शु० १५ वि स १२८५, त देवपालाच्या राज्यात नलकच्छपूर नगरीच्या नेमिनाथ चैत्यालयात पूर्ण झाला

सागारधर्मामृत— ही सुदर अष्टाध्यायी टीका पौष व.॥ ७ स. १२९६ ते पूर्ण केली त्यावेळीं श्रीमान् जैतुगितदेव माळव्यावर राज्य करीत होते.

अनागारधर्मामृताची टीका स्वोपज्ञटीका त्यानी पापासाधूचे पुत्र बहुदेव व पद्मसिंह. बहुदेवाचे पुत्र हरदेव, उदय व स्तभदेव. यापैकीं हरदेवाच्या विनंतीवरून व धनचद्राच्या आग्रहावरून ही टीका लिहिली गेली. ही नलकच्छपुरात नेमिनाथ भगवानाचे चैत्यालयात वि. स. १३०० च्या कार्तिक महिन्यात पूर्ण झाली.

याशिवाय नित्यमहोद्योत, भूपोळस्तोत्र ग्रथ लिहिले आहेत. ह्या १५।२० ग्रथामध्ये धर्मशास्त्रपर, तत्त्वज्ञानपर, वैद्यक, काव्यशास्त्र, भक्ति आणि योगमार्गपर असे बहुविध ग्रथ आहेत. तेव्हा मदनकीर्तियतींनीं आशाधराना प्रज्ञापुञ्ज ही पदवी दिली ती किती सार्थ आहे हें उघड होत आहे.

जिनयज्ञकल्पग्रथात ते म्हणतात कीं 'यावत्रिलोक्या जिनमन्दिरार्चाः तिष्ठन्ति शक्रादिभिरर्च्यमानाः। तावज्जिनादि प्रतिमाप्रतिष्ठा शिवार्थिनोऽनेन विधापयन्तु॥' जोपर्यंत ह्या तीन लोकात इद्रादिकाकडून जिनभगवानाची पूजा होत राहील तोपर्यंत ह्या ग्रथाच्या आधारानें कल्याणेच्छु जिनबिंबाची प्रतिष्ठा करोत. त्याच्या त्या इच्छेप्रमाणें का बरे होणार नाहीं? अमोलिक ग्रथ लिहून त्यानी तसें करण्याचा मार्ग सुलभ करून दिलेला आहे व त्याचा लाभ श्रावक घेत आहेतच. सागरधर्मामृताच्या भव्यकुमुदचद्रिकानामक टीकेत लिहितात की—

> यावत्तिष्ठति शासन जिनपतेश्छेदानमन्तस्तमो।
> यावच्चार्कनिशाकरौ प्रकुरुतः पूसा दशामुत्सवम्।
> तावत्तिष्ठतु धर्मसूरिभिरिय व्याख्यायमानानिशम्।
> भव्याना पुरुतोत्र देशविरताचारप्रबोधोध्दुरा॥

जिनशासन जोपर्यंत वर्धमान आहे, म्हणजे यावच्चद्र दिवाकरौ श्रावकधर्माचें ज्ञान करून देणारी ही टीका मुनिगणाकडून वाचली जावो. आशाधरपडिताची ही इच्छा सुद्धा श्रावकमडळीकडून पूर्ण करण्यात आली पाहिजे? पहिल्या श्लोकातील प्रतिष्ठामहोत्सवाची इच्छा काहीं अशी पूर्ण करण्यात येत आहे, पण दुसऱ्या श्लोकातील श्रावकधर्मप्रसाराची इच्छा तितक्या प्रमाणात पूर्ण करण्यात येत नाहीं ही दुःखाची गोष्ट होय. श्रावक भरपूर असतील

तर मुनिगण सागरधर्मामृतासारखे ग्रंथ वाचून दाखवितील. त्या लायकीचे मुनीहि अभावयास पाहिजेत हें खरें पण श्रावक समुदाय बहुसंख्याक व बहुश्रुत असला पाहिजे मग मुनीहि चांगलेच निघतात नाहींतर हल्लींसारखी शोचनीय व लज्जास्पद स्थिति प्राप्त होते. जसे श्रावक तसे मुनि! व असल्या श्रावक श्राविका व साधुसाध्वींचा अर्हत्संघ जिनशासनाचें वर्धन कसलें करणार! म्हणून श्रावकांची संख्या वाढविली पाहिजे त्यांना सच्छ्रावक बनविले पाहिजे व सम्यग्व्रतधारी मुनींनाच आश्रय देऊन जैनशासनोद्धाराचें कार्य आपण केलें पाहिजे प्रत्येक व्यक्तीस आप्त किंवा ऋषिऋण असतें तें फेडल्याशिवाय मुक्ति नाहीं. तें फेडण्यासाठी पंडित आशाधरासारख्या धर्मरक्षकाची इच्छा पूर्ण केली पाहिजे. मुसलमानांच्या टोळधाडीच्या काळांत जिनवाणीचें रक्षण व वर्धन करून ज्या पंडित प्रवरानें जिनानुयायांवर महदुपकार करून ठेवले त्याचें ऋण स्वकल्याणासाठींच त्याचे ग्रंथ वाचून व ग्रंथोक्त आचरण करून आपण फेडावयास नको काय? तसें न करणें ही मोठी कृतघ्नता होय, म्हणून तसें करण्याशिवाय गत्यंतर नाहीं। आशाधरपंडितासारख्यांचें ग्रंथ वाचून व स्वतंत्र ग्रंथरचना करून श्रावकगण जिनवाणीचा प्रसार करतील अशी आशा आहे असो

पंडित आशाधराच्या ज्ञातीस हल्लीं बघेरवाळ म्हणतात. त्याच्या पत्नीचें नांव सरस्वति. त्यांना छाहड नामक पुत्र होता. हा मुलगा विशेष विद्वान नव्हता असें दिसतें, पण आशाधराचे अनेक शिष्य बरेच विद्वान होते त्यापैकीं अर्हद्दास कवींचे, पुरुदेवचम्पू मुनिसुव्रत काव्य, भव्यजनकण्ठाभरण हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पंडितजी शेवटपर्यंत गृहस्थच होते पण त्यांचेजवळ अनेक मुनींनी शास्त्राध्ययन केलें असून त्यांनीं धर्मप्रभावना बरीच केली आहे ते व्रती-श्रावक होते. वर दिलेल्या त्याच्या ग्रंथापैकीं कांहीं ग्रंथ अजून अप्रसिद्ध आहेत. त्यापैकीं आम्ही प्रसिद्ध करीत असलेला एक ग्रंथ होय त्रिषष्टिस्मृतिशास्त्र हा ग्रंथ ५।७ वर्षांमागें ली भांडारकर इन्स्टिट्यूट मधून आणला होता याचें मराठी भाषांतर करून तो जनतेस सादर करण्याचा विचार तेव्हां पासून करीत होतो पण तसा योग्य योग येईना कांहीं वर्षांपूर्वी मूळ संस्कृत ग्रंथच श्री. माणिकचंद्र ग्रंथमालेंतून प्रसिद्ध करण्यानें ठरवून श्री. पं. नाथूरामप्रेमीकडे पाठवून दिला होता. पण तो अगदीं लहान आहे त्याला आणखी एक तितकाच लहान ग्रंथ जोडला या म्हणजे मग आम्ही छापून देऊ, असें उत्तर आलें तेव्हां तो

तसाच पडून राहिला. मध्यतरी जैनज्ञानकोशासाठी आदिपुराण व उत्तरपुराण वाचण्यास हाती घेतलें त्यावेळीं त्रिषष्टिस्मृतिच्या अनुवादाची कल्पना डोक्यात आली. त्याच कल्पनेचे हे मूर्तस्वरूप म्हणजे प्रस्तुतचा अनुवाद होय. हा अनुवाद मूळ श्लोकातील अर्थाला धरून पण मागील पुढील संदर्भ समजावा या दृष्टीनें लिहिला आहे. कारण त्रिसष्टिस्मृति हें शास्त्र अगदीं क्लिष्ट व सक्षिप्त आहे. त्यात केवळ ४८० श्लोकात त्रेसष्ट शलाका पुरुषाचेंच चरित्र गोंविलें आहे. आजपर्यंत जैनवाङ्मयकुसुमालेतर्फे मी जैन समाजाची थोडविहुत सेवा केली आहे. पण हा ग्रथ त्या मालेतर्फे प्रगट न करता श्री. माणिकचदग्रथमालेंतून प्रसिद्ध करण्याची इच्छा होती अनुवाद पूर्ण होताच पुन्हा प. श्रीनाथुरामप्रेमी व मालेचे ट्रस्टी श्री. ठाकोरदास भगवानदास याना भेटून त्याची सम्मति घेतली. सम्मतिवद्दल ट्रस्टीवर्य अभिनदनास पात्र आहेत. सदर मालेनें ग्रथप्रकाशनाचें काम वरेच केलें आहे मराठी भाषा जाणणारे जैन वहुसख्याक असल्यामुळें मराठी अनुवादितग्रथ ' माणिकचद ग्रथमाला ' मधून मधून असेंच प्रसिद्ध करील अशी पूर्ण अपेक्षा वाळगतों. मालेची सापत्तिकस्थिती सध्या खालावलेली आहे. त्यामुळें आम्हीं हा ग्रथ आमच्या खर्चानीच छापवून मालेतर्फे प्रसिद्ध करीत आहोंत. असाच हातभार प्रत्येक जैनधर्मप्रेमीयानी मालेला लावून माला अखड, अव्याहतपणें चालू राहील असा प्रयत्न करणें त्याचें मुख्य कर्तव्य होय. अशा वहुमूल्य ग्रथप्रकाशनाचें कार्य करणाऱ्या माला आपणात नाहींत. इतराच्या वाङ्मयक्षेत्राकडे पाहिले तर आपले वाङ्मयप्रसिद्धीकरणाचें क्षेत्र अगदी क्षुद्र दिसतें. एवढ्या मोठ्या जगद्व्यापी जैनधर्माची ही दुःस्थिती !! काळाचा महिमा और आहे !! या ग्रंथाच्या प्रशस्तीत आशाधर पडित लिहितात. " सोऽहमाशाधरः कण्ठमल कर्तु सधर्मणाम् । पञ्जिकालकृत ग्रथमिम पुण्यमरीचम् ॥७॥ सक्षिप्यताम्पुराणानि नित्यस्वाध्याय सिद्धये ॥ इति पण्डितजाजाका द्विज्ञप्तिः प्रेरिकात्रमे ॥ ९ ॥ धार्मिकाचे कठ भूषित करण्यासाठीच हा ग्रथ मी लिहिला. नित्यस्वाध्यायासाठी त्रेसष्ट शलाका पुरुषाची पुराणेंसक्षिप्त करून द्या अशी आकाक्षा पडितानी केलेली प्रेरणाच या ग्रथाला कारण आहे. या खुलाशावरून उच्च वाङ्मयाच्या दृष्टीनें या ग्रथाकडे न पाहता धर्मशील जैनाच्या रोजच्या गरजेच्या पूर्तीचेच दृष्टीनें पाहिलें पाहिजे. चौवीस तीर्थंकर, वाराचक्रवर्ती, नऊ वसुदेव, नऊ वळदेव व नऊ प्रतिवासुदेव मिळून त्रेसष्ट महापुरुषाना जैनलोक

फार पूज्य मानतात. त्याच्या नामावली व चरित्रें सर्व भाषातून अनेक विद्वानानी लिहिलेली आहेत. महापुराण व उत्तरपुराण हे ग्रथ त्यामध्यें प्रमुख आहेत. हे ग्रथ फार प्रचड आहेत. रोज पारायण करण्यास सुटसुटीत ग्रथ हवा. याद्दष्टीनें आशाधर पडितानी सुमारें पाचशे श्लोकाचे ( ४८० श्लोक ) त्रिपष्टिस्मृतिशास्त्र लिहून चागली सोय करुन दिली आहे असें म्हणण्यास हरकत नाही रामायण, महाभारतादि ग्रथाचेहि असे सक्षिप्तीकरण झालेलें आहेच त्या ग्रथापेक्षा हा ग्रथ अधिक दुर्बोध आहे हे खरें पण मूळविषयच क्लिष्ट असल्यामुळें आशाधराचा निरुपाय झाला आहे त्यामुळें महानुभावाच्या साकेतिक लिपीत लिहिलेल्या ग्रथाप्रमाणेंच या ग्रथाची गत झाली आहे

एकदरीत या ग्रथाच्या प्रसिद्धीमुळें आशाधर पडिताचा एक ग्रथ जनतेपुढें येत आहे माणिकचद्रग्रथमालेला मराठी ग्रथ प्रसिद्धीचें श्रेय मिळत आहे व धर्मशील जैनाना स्वाध्याय करण्यास एक ग्रथ मिळत आहे इतके फायदे होत आहेत. हें सर्व साधल्याबद्दल, ग्रथाचा अनुवाद करताना मिळालेल्या माझ्या परमभित्राच्या मदतीबद्दल व मालेतून ग्रथ प्रकाशित करण्यास दिलेल्या सम्मतिबद्दल त्या मालेच्या चालकाचा व इतर सर्व समाजाचा मी ऋणी आहे ग्रथाची १६५ पान श्री. प वर्धमानशास्त्री सोलापूर यानी आपल्या कल्याणप्रेसमध्यें छापून वेळेवर दिली याबद्दल त्याचा व श्री हनुमान प्रेसचे मालक व चालक श्री कोकाटे याचा त्यानी पुस्तकातील निवेदन व इतर मजकूर छापून दिल्याबद्दल आभारी आहे अशीच उत्तरोत्तर मजकडून सेवा घडो ही जिनेश चरणी मागणी आहे. प. आशाधरानीं हा ग्रथ वाचणारावर सम्यग्दर्ष्टी प्रसन्न होवो अशी शुभेच्छा प्रगट केलीच आहे त्याच्याच खालील श्लोकानें मी ही प्रस्तावना पुरी करतो.

> शान्तिः शंतनुता समस्तजगता सम्पच्छतां धार्मिकै ।
> श्रेय श्री परिवर्धता नयधुराधुर्यो धरित्रीपति. ।
> सद्विद्यारसमुद्गिरन्तु कवयो नामाप्यघस्यास्तु मा ।
> प्रार्थ्यं वा कियदेव एव शिवकृद्धर्मो जयत्वर्हत ॥

न्यायमार्गानें प्रजापाळ करणारा राजा धार्मिकलोकाच्या सहाय्यानें सर्व विश्वात शाति, सपत्ति व कल्याण वाटवो विद्वज्जन सद्विद्येचाच प्रचार करोत व पापकर्मे नावालाहि नसोत कल्याणकारी अर्हद्धर्माचा विजय असो या शिवाय दुसऱ्या कशाची इच्छा करावी ? इतिशम्

आषाढ पौर्णिमा वीर स २४६२ शनिवार, धागशिव

आपला सर्वाचा नम्र
मोतीलाल हिराचंद गांधी ( अज्ञात



नमः सिद्धेभ्यः ।

आचार्यकल्पाशाधरविरचितम्

# त्रिषष्टिस्मृतिशास्त्रम् ।

---

**वीरं नत्वेन्द्रभूतिश्च त्रिषष्टिश्रेष्ठपुंश्रितम् ।**

**इतिवृत्तम्ब्रुवे स्मृत्यै समासेन यथागमम् ॥ १ ॥**

तीर्थंकर महावीर, गणधर इंद्रभूति यांना नमन करून सर्वश्रेष्ठ अशा त्रेसष्ट ( चोवीस तीर्थंकर, बारा चक्रवर्ती, नऊ बलदेव, नऊ वासुदेव व नऊ प्रतिवासुदेव ) शलाका–पुरुषाचे मी संक्षिप्त चरित्र आगमाला धरून थोडक्यात सांगतो.

---

१ श्रेष्ठपुमांस शलाकापुरुषाः २ महापुराण ३ विस्तारस्त्वार्षपुराण-सारादौ द्रष्टव्यः ।

द्वीपेऽस्मिन्गान्धिले सिंहपुरे दृष्ट्वा खगेर्द्धश्रियम् ।
कुर्वन्निदानं वार्लर्षिर्जयवर्माऽरगान्मृतः ॥ २ ॥

या जम्बूद्वीपात मेरुपर्वताच्या पश्चिमेस असलेल्या अपरविदेह क्षेत्रातील गंधिल देशात सिंहपुर नगरी होती. तेथील राजा श्रीषेण याला सुंदरी नामक राणी होती. तिच्या पोटीं जयवर्मा व श्रीवर्मा नामक दोन पुत्र झाले. राजानें योग्य रीतीने राज्य करून व सुखोपभोग घेऊन दीक्षा घेतली. तेव्हा लहान मुलगा श्रीवर्मा यास त्याने गादीवर बसविले. त्यामुळे वडिल मुलगा जयवर्मा संतापला रागाचे भरात त्यानेहि दीक्षा घेतली. पण संयमी जीवन त्याला झेपले नाही. आकाशमार्गाने विमानातून जाणाऱ्या महीधर विद्याधराचें वैभव पाहून त्याने आपणास तसे भोग मिळावेत असे मोहानें निदान बांधले व तो सर्पदंशाने मरण पावला.

तद्वदार्द्धयेऽल्केन्द्रोऽभून्नामार्थाभ्यां महाबलः ।
स्वयम्बुद्धाप्तधर्मोऽसावीशाने ललिताङ्गकः ॥ ३ ॥

गंधिल देशाच्या मध्यभागी असलेल्या विजयार्ध पर्वताचे उत्तरश्रेणीवर अलका नगरी होती. त्या अलका नगरींत सहस्रबल

[illegible] जम्बूद्वीपके २ अपरविदेहदेशस्थे ३ तत्समीपवने ४ महीधरनामविद्याधरस्याकाशे गच्छतो विभूतिं ५ नवसंयतत्वादजातसमयस्थितिर्निदानं कुर्वन् अनेन तपसा ईदृशा भोगा मे भवांतरे भूयासुरिति ध्यायन् ६ अजातराज्य [illegible] श्रीषेणाख्येन पित्रा प्रव्रजता श्रीवर्मनाम्ने [illegible] राज्ये दत्ते संजातनिर्वेद सन्स्वयंप्रभमुनिपार्श्वे प्रव्रजितः, व्यासस्त्वा [illegible] ७ सर्पदंशनात् ८ गंधिलदेशमार्द्धे.

नामक राजा होता. त्याने योग्य रीतीने राज्य कारभार करून दीक्षा घेतली व शुक्लध्यानांत मरण पावून तो मोक्षास गेला. त्याचा मुलगा शतबल धर्मानें राज्य करून धर्मध्यानात मेला. त्याचा मुलगा अतिबल. त्याला मनोहरा नामक राणी होती. तिचे पोटी जय-वर्माचा जीव महाबल नावाने जन्मास आला. हा नांवाप्रमाणे पुरु-षार्थशाली निपजला. योग्य समयी अतिबलाने याला गादीवर बसवून दीक्षा घेतली. महाबलाला लौकायतिक मताचा महामति, विज्ञानवादी संभिन्नमति, अनात्मवादी शतमति व स्याद्वादी ह्मणजे जैनमताचा स्वयंबुद्ध असे चार मंत्री होते. स्वयंबुद्धाने महाबलास जैनधर्माचें रहस्य समजावून सांगितले. एकदा तो अकृत्रिम चैत्या-लयास दर्शनार्थ गेला असता तेथे महाकच्छ देशातील अरिष्ट नगरांचे गगन--चारण--मुनि आदित्यगति आले असतां महाबल दहाव्या जन्मीं तीर्थंकर होणार आहे असे त्यांनी मन्त्रिवराला सांगितले. पुढे योग्यवेळी महाबलाने बावीस दिवसपर्यंत सल्लेखना धारण केली व मरणानतर तो ऐशान स्वर्गात ललितांग नामक देव झाला.

भूत्वा व्याघ्रेण सैन्यासात्पुरोधोदण्डिमान्त्रिभिः ।
दानादार्यवृतस्तज्जैः शं स्वयम्प्रभयान्वभूत् ॥ ४ ॥
सोऽभूदुत्पलखेटेशो वज्रजङ्घोऽस्य सा प्रिया ।
ते व्याघ्रादिचरा मंत्रिश्रेष्ठिसेनट्पुरोधसः ॥ ५ ॥

१ सेनापतिः २ प्रीतिवर्द्धननृपदानानुमोदनप्राप्तार्यत्वः ३ स्वयंप्रभान्वरौ ।

मंत्री मतिवरः श्रेष्ठी धनमित्रः पुरोहितः ।
आनन्दोऽकम्पनः सेनेड् वज्रस्य श्रीमती प्रिया ॥६॥

पूर्वविदेह क्षेत्रातील पुष्कलावती देशातील उत्पलखेट नगरीचा राजा वज्रबाहु. त्याची भार्या वसुधरा. याचे पोटीं महाबलाचा जीव ललितांगदेव स्वर्गाचें सुख भोगून वज्रजंघ नामे जन्मला. त्याचे मामा चक्रवर्ती वज्रदत्त. याची पुत्री श्रीमती त्याची प्रिया झाली. ही श्रीमती ललितांग देवाची सहचरी स्वयंप्रभा पूर्वभवात धातकीद्वीपात पूर्वमंदरपर्वताच्या पश्चिमेकडील विदेहक्षेत्रात गंधिल-देशातील पलालपर्वत नामक गावात देविल पाटलाची मुलगी होती. त्या भवात तिनें समाधिगुप्त मुनि ध्यानस्थ असता त्याचे अंगावर मेलेलें कुत्रें टाकून त्याचा अपमान केला. पुढें ती पाटलीग्रामात नागदत्त वाण्याची कन्या होऊन जन्मली. तेथें पिहितास्रव मुनि-जवळ व्रतें घेऊन तिने तीं पाळल्यामुळे ऐशान स्वर्गांत स्वयंप्रभा देवी झाली. प्रीतिवर्धन राजाच्या मुनिदानास अनुमोदन दिल्यामुळें झालेल्या पुण्योपार्जनानें पुरोहित, सेनापति व मंत्री याचा आणि व्याघ्रभवातील तपामुळे मतिवर मंत्र्याचा समागम झाला. अर्थात् ते व्याघ्रादिक वज्रजंघाचे पुरोहित, मंत्री, सेनापति व श्रेष्ठी झाले. मंत्र्याचें नाव मतिवर, श्रेष्ठीचें नाव धनमित्र, पुरोहिताचे नाव आनंद व सेनापतीचें नाव अकंपन होतें. वज्रजंघराजाने दमधर व सागरसेन मुनींना आहार दान दिल्यावर आपल्या चार मित्राची

१ वज्रजंघस्य ।

भवावली विचारली. तिचा मथितार्थ असा—मतिवर मंत्री पूर्वभवांत प्रभाकरी नगरीचा अतिगृद्ध राजा होता. तो फार विषयी असल्यामुळे पंकप्रभा नरकात पडला. नरकांतून तो वाघाच्या जन्मास गेला. एकदां प्रभाकरी नगरीचा त्यावेळचा राजा प्रीतिवर्धन जंगलात गेला असता पिहितास्रव मुनि त्याला भेटले. माध्यान्हकाल असल्यामुळे पुरोहिताने त्याना आहारदान करण्याचा राजास सल्ला दिला. राजानें तो केल्यामुळे रत्नवृष्टि झाली. मुनि ह्मणाले कीं जवळच एक वाघ तपश्चर्या करीत आहे व तो पुढें भरत चक्रवर्ती होणार आहे. राजा मुनीसह तो चमत्कार पहावयास गेला. अठरा दिवस अनशन करून संन्यासविधीने तो वाघ मेला व देवलोकात गेला. तो प्रकार पाहून प्रीतिवर्धन राजाचे, मंत्री, सेनापति व पुरोहित याना उपरति झाली व मरणानतर ते भोगभूमींत जन्मले. तेथून ऐशान स्वर्गांत गेले. स्वर्गांतून ते चौघे वज्रजंघ राजाचे मित्र होऊन जन्मले, या सर्वांच्या समागमे राजा सुखी झाला.

> तौ दम्पती मृतौ भूमादपिदानाद्दक्कुरौ ।
> जाता व्याघ्रक्रोडकीशनकुलाश्च तदिष्टितः ॥ ७ ॥
> द्वितीयैकोपादिबद्धायुष्का व्याघ्रादयस्तदा
> वनादेत्य नृपावासाद्वहिस्तस्थुर्मुनीक्षिणः ॥ ८ ॥

---

१ उत्तमभोगभूमौ उत्पन्नौ २ सूकरः ३ वानरः ४ तयोर्मुनियुगलयोरिष्टिर्दानापूजा ततः ऋषिदानानुमोदनात्. ५अप्रत्याख्यान ६ दानकाले.

वज्रजंघ व श्रीमती हे दांपत्य ऋषि दानामुळे मरणानंतर उत्तरकुरु नामक भोगभूमींत जन्मले. त्या दंपतीने जेव्हा मुनीला दान दिले तेव्हा व्याघ्रादि तिर्यंच चार कषायामुळे ज्याना ती (तिर्यंग्गति) गति प्राप्त झाली होती ते मुनीकडे पाहात नृपगृहाबाहेर उभे होते. त्याना पाहून राजानेहि त्याचे भवांतर विचारले. मुनि म्हणाले " पुष्कलावती देशातील हस्तिनापुरच्या सागरदत्त श्रेष्ठीस धनवती नामक भार्येपासून उग्रसेन नामक पुत्र झाला. अप्रत्याख्यान क्रोध-कषायाच्या उदयाने राजदूतास दरडावून तो राजाचे कोठारातून माल चोरून नेई. राजानें शासन केल्यामुळे मरून तो वाघ झाला. विजयनगरात महानंद राजास वसंतसेनेच्या पोटी हरिवाहन नामक पुत्र होता. तो अप्रत्याख्यान मानकषायामुळें मातापितराचाहि अपमान करी. असाच एकदा पित्याची आज्ञा मोडून तो पळत सुटला असता खांबावर डोकें आपटून मेला व सूकराच्या जन्मास गेला. धान्य-नगरात कुबेरश्रेष्ठीस सुदत्तेचे पोटी नागदत्त नामक पुत्र झाला. तो अप्रत्याख्यान मायाकषायामुळे घरच्यानाहि फसवीत असे. त्यामुळें मेल्यावर तो माकड झाला. सुप्रतिष्ठित नगरात लोलुप नामक मिठाई-वाला होता. चैत्यालयाचे बांधकाम चाललें असता तो मजुराना मिठा-ईची लाच देऊन विटा चोरून आणी. या अप्रत्याख्यान लोभामुळे तो मेल्यानंतर मुंगूस झाला. ' पुढे हे वाघ, सूकर, वानर व नकुल सुद्धा ईर्षामुळें म्हणजे मुनिदानाच्या अनुमोदनापासून उत्पन्न झालेल्या पुण्यामुळे त्याच भोगभूमींत गेले.

**तेस्मिन्विशुद्धदृग्लाभाच्छ्रीमत्याप्यार्यके: समम् ।**
**श्रीधरो वज्रजङ्घार्यो भूत्वैशानेऽस्फुरत्तराम् ॥ ९ ॥**

त्या उत्तरकुरुभोगभूमीत ते चार तिर्यंच जीवहि उत्तम आर्य-पुरुष झाले. व श्रीमतीसह वज्रजंघ ईशानस्वर्गात श्रीधर नामक देव झाला.

**स जातु स्वगुरुं प्राप्तकैवल्यं प्राच्यं मंत्रिणः ।**
**ते मे काद्येति पृष्ट्वा तद्वाचा वंशों गतो दृशम् ॥१०॥**

महाबलाचा मंत्री स्वयंबुद्ध मरून सौधर्म स्वर्गातील स्वयंप्रभ विमानांत माणिचूल देव झाला. जम्बूद्वीपातील पूर्वविदेह क्षेत्रांत पुष्कलावती देशात मोडणाऱ्या पुंडरीकिणी नगरीचा राजा प्रियसेन, त्याच्या सुंदरी राणीच्या पोटी स्वयबुद्धाचा जीव प्रीतिंकर नामे जन्मला. याने दीक्षा घेतली. अवधिज्ञानाने पूर्वभव जाणून त्याने वज्रजंघास उत्तरकुरूभोगभूमींत जाऊन उपदेश दिला. पुढें यास श्रीप्रभ पर्वतावर केवलज्ञानप्राप्ति झाली. तेव्हा श्रीधर—देवाने येऊन त्याचें पूजन केले. व महाबलभवातील माझे इतर तिघे मंत्री हल्ली कोठे आहेत ह्मणून श्रीधरदेवाने विचारले. तेव्हां ते नरकात आहेत असे प्रीतिकरमुनींनी सांगितल्यावर तो दुसऱ्या नरकाकडे गेला.

---

१ जम्बूद्वीपोत्तरकुरौ. २ प्रीतिंकरमहामुनिं ३ प्रीतिंकरगुरुवचनेन ४ द्वितीया नरकभुवं.

नीत्वा शतमतिं चक्री तुग्भूयोपयमोद्यतम्
तपो नीत्वा ब्रह्मशक्रीकृतमेत्याददानतम् ॥ ११ ॥

श्रीधर देवाने शतमतीला सम्यग्दर्शनाचा उपदेश केला तो पटल्यामुळे तो नरकातून निघून पुष्करद्वीपाच्या पूर्वार्धातील पूर्व-विदेहक्षेत्रातील मंगलावती देशाच्या मध्यभागातील रत्नसंचय नगरीचा जो महीधर चक्रवर्ती त्याच्या सुंदरीदेवीच्या पोटीं जयसेन नामें करून जन्मला. पुढे यमधर मुनींजवळ दीक्षा घेऊन समाधीनें मेल्यावर तो ब्रह्मस्वर्गांत इंद्र झाला.

यौ महामतिसंभिन्नमती मिथ्यात्वदार्ढ्यतः ।
तौ निगोदास्पदं यातौ तनोर्वतः सोऽन्वकम्पत् ॥१२॥

महामति व संभिन्नमति नामक दुसरे दोन मंत्री निगोदात म्हणजे नरकात खितपत पडले आहेत असे प्रीतिंकरमुनिकडून ऐकून श्रीधरदेव कळवळला.

महावत्से सुसीमेश स भूत्वा सुविधिः सुते ।
केशवे श्रीमतीजीवे स्नेहादार्यव्रतं गृहे ॥ १३ ॥

जंबूद्वीपांतील विदेहक्षेत्रात महावत्स देशातील सुसीमा नगरीचा राजा सुदृष्टि व राणी सुनंदा यांच्या पोटी श्रीधरदेव स्वर्गांतून येऊन सुविधि नावाने जन्मला. अभयघोष चक्रवर्तीची

१ पुष्करार्धे पूर्वमंदरे मंगलावत्यां रत्नसंचये महीधराख्यचक्रिणः पुत्रो जयसेनाख्यो भूत्वा २ विवाहकरणोद्यतं ३ सः श्रीधरः अभ्यनंदत. ४ तेन गुरुणा ५ न महाबलाचर श्रीधर हा कष्ट कथं तादृग्दुःखात्तौ उद्धरेयमिति अतरार्द्रतया प्रत्यपद्यत ६ देशमध्यमसर्वस्वं भक्त्वा आराध्य.

मुलगी मनोरमा त्याला देण्यात आली. तिच्यापासून त्याला केशव नामक पुत्र झाला ( हा श्रीमतीचाच जीव होता. कारण तो स्वर्गात देव झाला होता व तोच केशव झाला. )

**भक्त्वा जातोऽच्युतेन्द्रोऽस्य तुक्प्रतीन्द्रो महाव्रतैः ।**
**व्याघ्राद्यार्यामरा राजपुत्राः सामानिकाश्चतैः ॥१४॥**

या बापलेकानी श्रावकव्रते पाळून देहत्यागानंतर ते अच्युतेंद्र व प्रतींद्र झाले. व्याघ्रादिकांचे जीव वज्रजंघाबरोबर उत्तरकुरूंत जाऊन जन्मले. तेथून प्रीतिंकर चारण मुनीच्या उपदेशामुळे ऐशान कल्पांत देव झाले. तेथून वानराचा जीव चित्रांगद, वराहाचा जीव राजा नंदिषेण याची राणी अनंतमतीच्या पोटीं वरसेन, व्याघ्राचा जीव बिभीषणराजाच्या प्रियदत्ता देवीच्या पोटी वरदत्त व नकुलाचा जीव प्रशांतमदन नामे जन्मले. या सर्वांनी अभयघोषचक्रवर्ती बरोबर दीक्षा घेतल्यावर ते मरून सामानिक देव झाले.

**अथेन्द्रः पुष्कलावत्यां वज्रनाभिः स चक्रभृत् ।**
**सामानिकास्तदनुजाः प्रतीन्द्रस्तद्गृहे वणिक् ॥ १५ ॥**

नंतर तो अच्युतेंद्र पुष्कलावती देशांतील पुंडरीकिणी नगरीचा राजा वज्रसेन व राणी श्रीकांता यांचे पोटी वज्रनाभिनामे करून

१ पश्चाप्येते केशवेन सह नैर्ग्रंथ्यदीक्षां प्रतिपन्नाः । केशवः प्रतीन्द्रोऽभवत् । चत्वारो राजपुत्रासामानिका अभवन् । २ सुविधिचरः ३ तस्य चक्रिणो विजयवैजयंतजयंतापराजित संज्ञाः ४भांडागारिकः धनदेवाख्याः

जन्मला. व्याघ्रादि चौघे सामानिक देवगतींतून यांच्याच पोटीं विजय, वैजयत, जयत व अपराजित म्हणून जन्मास आले. मर्तांद सुद्धा त्याच नगरींत कुबेरदत्तश्रेष्ठी व अनतमती यांच्या उदरीं धनदेव नावाने जन्मला.

चत्वारो वज्रजङ्घस्य येऽस्य मन्त्र्यादयोऽनुजाः ।
तथा सत्तपसा प्राप्तादधोग्रैवेयकाच्च्युताः ॥ १६ ॥

वज्रजंघाचे जे चौघ मतिवरादि मित्र होते ते अधोग्रैवेयक स्वर्गांतून वज्रसेन राजाचेच पोटीं जन्माला आले. आनंद पुरोहित महाबाहु नामे जन्मला. अकंपन सेनापति पीठनामे झाला. धनमित्रश्रेष्ठी महापीठ झाला आणि मतिवर मंत्री सुबाहु नामे जन्मला. पूर्वभवातील सत्पापामुळेच असे हे नऊजण सहोदर जन्मले.

ते दशापि श्रियं भुक्त्वा चिरं श्रीवज्रसेनतः ।
तीर्थकर्तुस्तपःसम्यक्तेपिरे तेषु चादिमः ॥ १७ ॥

वरील दहाजणानीं समार करून बराच काळ. वज्रसेनाची राज्यश्री भोगून दीक्षा घेतली आणि वज्रनाभीने तर तीर्थकर गोत्र बांधण्याजोगी तपश्चर्या केली.

दृग्विशुद्ध्यादिनस्तीर्थकृत्त्वं बद्ध्वाद्यशुक्लभाक् ।
सर्वार्थसिद्धौ जातोऽस्मा सतीर्थ्यैः सोऽत्र नाभितुक् १८

१ मतिवरचर सुबाहु, धनमित्रचरो महापीठ, आनदचरो महाबाहुः; अकंपनचर पीठ २ दशानु मध्ये ३ प्रथमो यश्चक्री ४ एकगुरुभिरष्टाभिरनु जैर्धनदेवेन च सह ५. वज्रनाभिचर. ६ साकेते नाभिराजान्मरुदेव्याम् ।

दर्शनविशुद्धि, विनय, अनतिचार शीलव्रत, अभीक्ष्णज्ञानोपयोग व संवेग वगैरे सोळा भावना पाळून वज्रनाभीने तीर्थकर कर्म बांधले. ( निःशंका वगैरे आठ अंगानी युक्त, अष्टमदरहित, सहा अनायतन विरहित, व मूढत्वत्रयरहित जे तत्वार्थश्रद्धान ती दर्शनविशुद्धि, कषाय सोडणे व रत्नत्रयमंडित मुनींचा आदर करणे म्हणजे विनय, अतिचारविरहित शीलव्रते पाळणे, सम्यक्ज्ञानाचा अखंडपणे विचार करणे हा अभीक्ष्णज्ञानोपयोग आणि संवेग म्हणजे संसारतापाचे भय वाळगून वैराग्य वाटणें ) आठ भाऊ व धनदेवादि गुरुबंधूसह तो सर्वार्थसिद्धिनामक स्वर्गात जाऊन अहमिंद्रदेव बनला. तोच आता नाभिराजाचा पुत्र आदितीर्थकर झाला आहे.

**मनुः[1] पञ्चदशो राजराजा[2]स्त्र्येकशतापत्यसूः[3] ।**
**इक्ष्वाकुर्[4]वृषभोऽस्त[5]श्रीर्नटनीलाञ्जसात्ययात् ॥ १९ ॥**

पंधरावा मनु ( देशविरति व व्यवहारोपदेशक असा ) एकशे तीन आपत्याचा जनक, क्षुधिताना इक्षुरसाचा आहार करण्याचा ज्याने उपदेश केला अशा वृषभदेवाने नीलांजसा नामक देवांगना नृत्यकरीत असतां अकस्मात् मरण पावली हे पाहून राज्यत्याग करून त्याने दीक्षा घेतली.

१ लोकव्यवहारोपदेष्टा देशसंयमधरश्च. २ सोमप्रभकच्छादीनां राजा ३ त्र्युत्तरशतप्रमाणापत्यानि जनितवान्. ४ प्रजानां क्षुधार्तानां इक्षुभक्षण लक्षणोपदेशकरणाल्लब्धेक्ष्वाकुसंज्ञः ५ त्यक्तलक्ष्मीकः

श्रेयोब्दलब्धेक्षुरसपारितोब्दसहस्रतः ।
लब्धकेवल एवाद्यतीर्थकृद्भूय निर्वृतः ॥ २० ॥

एक वर्षाच्या उपवासाचे पारणे श्रेयान् युवराजाकडून मिळालेल्या इक्षुरसाने करणारा. कैवल्य प्राप्त झालेला असा तो आदि-तीर्थंकर मुक्त झाला.

जयवर्ममहाबलललिताङ्गागरवज्रजङ्घकुरून्नतयाऽयात् ।
श्रीधरसुविधिनृपाच्युतभवज्रनाभ्यन्त्यसुरतया च पुरुर्न ॥ २१

जयवर्मा, महाबल, ललितांगदेव, वज्रजंघ, उत्तरकुरुभोगभूमींतील आर्य, श्रीधरदेव, सुविधिराज, अच्युतेंद्र, वज्रनाभि, सर्वार्थसिद्धि स्वर्गांतील अहमिंद्र या सर्व भवांतून उत्तीर्ण झालेले श्रीआदिनाथ तीर्थंकर आमचें रक्षण करोत.

धनश्रीरथनिर्नाम्नी ततो देवी स्वयम्प्रभा ।
श्रीमत्यथ कुरुस्त्रीतस्ततो देवः स्वयम्प्रभः ॥ २२ ॥
केशवश्च प्रतीन्द्रश्च धनदत्तो धनाधिपः ।
ततोऽन्त्यदेवः स श्रेयान्स्याद्दानादितीर्थकृत् ॥२३॥

धनश्री निर्नामा, स्वयंप्रभादेवी, श्रीमती कुरुस्त्री, स्वयंप्रभदेव, केशव, प्रतींद्र, धनदत्तशेठ, अन्त्यदेव दानतीर्थाचा प्रवर्तक श्रेयान् राजा झाला. त्याचा जयजयकार असो.

१ येन युवराजादब्दृत्स्यान्ते स्वल्पान्नमानन प्राप्तेक्षुरसेन पारितः कृतपारणः एतेन वर्षमासापरानि तीर्थंकरः कृतोपवासा नाभा रहे पारणा पैत्तव्य प्रति सूचितं प्रतिपत्तव्य २ अस्मान्पुरुर्जीर्ण आदिगुरुत्वात्.

राजातिगृध्रो घार्मोऽद्रौ व्याघ्रो देवो दिवाकरः ।
मन्त्री मतिवरोऽधोऽहमिन्द्रो योऽभूत्सुबाहुकः ॥२४॥
विराट् सर्वार्थसिद्धश्च स जयाद्भरतः पुरोः ।
आद्यः पुत्रोऽथ चक्रभृत्षोडशो हि मनुर्महान् ॥२५॥

अतिगृध्रराजा, नारकी जीव, वाघ, देव, मतिवरमन्त्री, अहमिन्द्र, सुबाहु, वज्रसेन तीर्थकराचा पुत्र वरदत्तराज, सर्वार्थसिद्धि स्वर्गांतील देव आदि भव घेऊन भरत झालेला प्रथम तीर्थकराचा प्रथम पुत्र चक्रवर्ती, सोळावा मनु ( देश विरति व लोकव्यवहारोपदेशक या अर्थाने ) जयशाली होवो.

यो मन्त्री वत्सकावत्यां प्रीतिवर्द्धनभूपतेः ।
प्रभाकरीपुरीहोदक्कुरुना कनकप्रभः ॥ २६ ॥
आनन्दोऽधोऽहमिन्द्रोऽभून्महाबाहुरनुत्तरे ।
सुरश्चान्त्ये स पुरुतुक्कामो बाहुबलीज्यताम् ॥ २७ ॥

वत्सकावती देशातील प्रभाकरी नगरीच्या प्रीतिवर्धन राजाचा मंत्री व उत्तर कुरुभोगभूमीतील आर्य कनकप्रभ नामक वैमानिक

१ धर्माया भवो घार्मा नारकः २ विशिष्ट राजा वज्रसेन तीर्थकरपुत्रः ३नगर्यां ४ भूमौ ना पुमान् ५ काचनाविमानेश ६ सर्वार्थसिद्धौ. ७ पूज्यता शिवार्थिभिः

देव झाला. नंतर तो आनंद पुरोहित झाला. पुढें अधोग्रैवेयकांत अहमिंद्र झाला. नंतर महाबाहु भवांतन सर्वार्थसिद्धि स्वर्गांतील देव बनला. तेथून तो जीव प्रथम कामदेव बाहुबली झाला आहे. तो पूज्य आहे.

प्रीतिवर्धनसेनानी योऽभूदार्य उदक्कुरौ ।
प्रभाकरप्रभोधीशः सेनापतिरकम्पनः ॥ २८ ॥
अधोग्रैवेयकामर्त्यः पीठः सर्वार्थसिद्धिजः ।
जीयाद्वृषभसेनोऽग्रगणी स भरतानुजः ॥ २९ ॥

प्रीतिवर्धन राजाचा सेनापति उत्तर कुरुभोगभूमींत आर्य होऊन प्रभाकर विमानांत देव झाला. तेथून तो वज्रजंघराजाचा अकंपन मंत्री झाला. तेथून तो जीव अधोग्रैवेयक स्वर्गांत देव झाला. पुढें तो वज्रसेन राजाचा पीठ नामक मुलगा झाला. नंतर तो सर्वार्थ-सिद्धि नामक स्वर्गांत जाऊन आतां भरतचक्रवर्तीचा भाऊ वृषभ-सेन म्हणून जन्मला. हा आदितीर्थंकराचा प्रथमगणधर झाला. त्याचा जयजयकार असो.

पुरोहितः प्रभाकर्या भर्तुः प्राग्भोगभूमिजः ।
प्रभञ्जनो रुचितराड् धनमित्रो वणिक्पतिः ॥३०॥
अहमिन्द्रो महापीठश्चरमानुत्तरामरः ।
योऽभूद्यशोमतो जातःसोऽनन्तविजयः पुरोः ॥ ३१ ॥

---

१ विमान २ प्रीतिवर्द्धन नृपस्य. ३ रुचितविमानेन्द्रः ४ सर्वार्थसिद्धौ देवोऽभूत् ५ महात्म्ना भरतमातरि

प्रीतिवर्धन राजाचा पुरोहित इषित विमानात प्रभंजन देव झाला. नंतर तो धनमित्रशेठ झाला. पुढें तो अहमिंद्र होऊन वज्रसेन राजाचा मुलगा महापीठ झाला. नंतर सर्वार्थसिद्धि स्वर्गात देव होऊन ऋषभतीर्थंकरांच्या यशोमती राणीचे पोटी अनंतविजय नांवानें जन्मला.

यो वैश्य उग्रसेनाख्यो व्याघ्रोऽत्रोदक्कुरूद्भवः ।
चित्राङ्गदः सुरो जज्ञे वरदत्तो नृपात्मजः ॥ ३२ ॥
सामानिकोऽच्युतेन्द्रस्य विजयो वज्रसेनजः ।
अन्त्योऽहमिन्द्रः सोऽनन्तवीरो वीरः पुरोःसुतः ३३

उग्रसेन नामक जो वैश्य अप्रत्याख्यान क्रोधामुळे वाघ बनला होता तो उत्तरकुरु भोगभूमीत आर्य झाला. नंतर चित्रांगद देव झाला. पुढे वरदत्तनामक नृपपुत्र होऊन सामानिक देव अच्युतेंद्र झाला. तेथून तो जीव वज्रसेन राजाचा विजय नामक पुत्र झाला. नंतर अहमिंद्र होऊन आता तो अनंतवीर नामक आदि तीर्थंकर पुत्र झाला आहे.

हरिवाहननांपत्यः शूकरः कुरुमानवः ।
मणिकुण्डलिनन्देशो वरसेनो नरेन्द्रतुक् ॥ ३४ ॥
योऽभूत्सामानिकामर्त्यो वैजयन्तो जिनांऽगजः ।
अन्त्यानुत्तरदेवश्च पौरवेः सोऽच्युताव्हयः ॥ ३५ ॥

१ राजपुत्रः २ नंदाख्याविमानस्वामी. ३ वज्रसेनतीर्थंकरस्य पुत्रः ४ पुरोरपत्य.

पूर्वभवात हरिवाहन नामक राजपुत्र असलेला शूकर पुढे उत्तर-कुरु नामक भोगभूमींत आर्य बनला. नदाख्य विमानात माणिकुंडली देव होऊन वरसेन राजा झाला. पुढे तो जीव सामानिक देव होऊन नंतर वज्रसेन राजाचा पुत्र वैजयंत नामे झाला. तेथून सर्वार्थसिद्धींत अहमिंद्र होऊन तो आता अच्युत नावाने तीर्थिकरपुत्र झाला आहे.

यो वणिग्नागदत्ताख्यः कपिः पूर्ववदार्यकः
मनोहरामरो राजपुत्रश्चित्राङ्गदश्रुति ॥ ३६ ॥
जज्ञे सामानिकसुरो जयन्तस्तीर्थतुक् पुनः ।
पञ्चमेऽनुत्तरेऽमर्त्यः स वीरः पुरुनन्दनः ॥ ३७ ॥

नागदत्त नावाचा जो वणिक् वानर झाला होता तो देवगतींत मनोहर नामक देव होऊन पुढे चित्रांगद नामक राजपुत्र झाला. तो जीव सामानिक देव होऊन व वज्रसेन राजाचा जयंत नामक पुत्र झाला. नंतर पांचव्या स्वर्गात अनुत्तर विमानातील देव होऊन तो आता आदितीर्थिकरपुत्र वीर नामे करून झाला आहे.

आपूपिको लोलुपाख्यो नकुलो दिव्यमानुषः ।
मनोरथःपार्थिवतुक् प्रशान्तमदनाभिधः ॥ ३८ ॥
योऽच्युतेन्द्रसमो देवो जिनपुत्रोऽपराजितः ।
स्वरेकैचरमश्चाभून्मुनीशस्य स पारवः ॥ ३९ ॥

१ नन्दावर्तविमानेश २ नाम राजपुत्र ३ वज्रसेनतीर्थंकरस्य ४ सर्वार्थसिद्धौ ५ सादिक. ६ उत्तरकुरुनर ७ प्रभाकरविमानेशः ८ चित्रमालिनीप्रभञ्जनयोः अगिदभार्यान्यो । ९ सामानिक, १० वज्रसेनस्य ११ सर्वार्थसिद्धि.

लोलुप नावाचा जो मिठाईवाला नकुल झाला होता तो पुढें उत्तरकुरुभोगभूमीत जाऊन तेथून प्रभाकर विमानांत देव झाला. नंतर प्रशांतमदन नांवाचा राजपुत्र झाला. पुढे अच्युतेंद्राचा सामानिक देव होऊन तो जीव वज्रसेन राजाचा अपराजित नामक पुत्र झाला. नंतर सर्वार्थसिद्धि देवलोकातून तो आतां सुवीर नामक तीर्थंकरपुत्र झाला.

**संन्यासमृत्युदानानुमोदसद्भक्तपोऽर्जितैः ।**
**पुण्यैस्तेऽभ्युदयान्भुक्त्वा सिद्धाःसिद्धिं दिशन्तु नः ४०**

संन्यासमरण, दानानुमोदन, वगैरे सारख्या पुण्यकर्मांनीं मिळालेले अभ्युदय भोगून जे सिद्ध झाले ते आम्हालाहि सिद्धि देवोत.

**इत्याशाधरहब्धे त्रिषष्ठिस्मृतिनाम्नि महापुराणान्तस्तत्त्वसङ्ग्रहे श्रीवृषभतीर्थङ्करभरतेश्वरादिनिर्वृत्तिपुराणं प्रथमम् ॥१॥**

---

**वत्सादेशे सुसीमाप्तः स्वामी विमलवाहनः ।**
**चित्राद्राज्याद्विरज्यात्तव्रतो वद्ध्वान्त्यनाम शँद् ॥ १ ॥**

वत्सदेशात सुसीमा नगरीचा पति विमलवाहन नामक राजा होता. त्याने बराच काळपर्यंत राज्यसुख भोगून त्याचा त्याग केला व व्रतधारी होऊन तीर्थंकर कर्म बांधले.

---

१ द्वीपेऽस्मिन्निति वर्तते, जबूद्वीपपूर्वविदेहस्थे २ सुसीमा आप्ता प्राप्ता येन सः ३ गृहीतसंयमः ४ तीर्थंकरत्वनाम, सर्वेषां तीर्थकृतां तद्बधकाले प्रायेणैकादशांगश्रुतज्ञान बोद्धव्य.

निर्विश्यं विजये भूत्वा साकेते जैतशात्रवैः ।
दीक्ष्योल्कां त्यक्तराज्योऽव्यात्कृततीर्थोऽत्र नोऽजितः॥

तेथून तो विजयनामक प्रथम अनुत्तर विमानात देव झाला. पुढें अयोध्यानगरींत जितशत्रुराजा व विजयसेनादेवी याच्या पोटीं तो जीव अजितनाथ तीर्थंकर म्हणून जन्मला. उल्कापात पाहून त्याना उपरति झाली व अजितसेन नामक पुत्राचे हातीं राज्यकारभार सोंपवून त्यानीं दीक्षा घेतली व धर्मप्रसार करून मोक्षास गेले.

यो वत्सकावतीपृथ्वीपुरेशो जयसेनकः ।
रतिषेणसुतेऽतीते धृतिषेणेऽर्पितक्षिति. ॥ ३ ॥

जम्बूद्वीपात पूर्व विदेहक्षेत्रात सीतानदीचे तीरीं वत्सकावती नावाच्या देशातील पृथ्वीपुर नगरींचा राजा जयसेन व राणी जयसेना त्याना रतिषेण व धृतिषेण नामक दोन पुत्र होते. रतिषेण अकस्मात् वारल्यामुळे खिन्न होऊन जयसेन राजानें धृतिषेणाला गादीवर बसविले.

महारुतेन श्यालेन सह कृत्वा तपोऽच्युते ।
देवो महाबलः सोऽभूदितरो मणिकेतुक. ॥ ४ ॥

आपला मेहुणा महारुत याच्यासह यशोधर मुनीजवळ दीक्षा

१ गुरूना २ प्रथमानुत्तरविमाने ३ जितशत्रोरपत्य विजयसेनादेव्यासुतम ४ स्वयं उत्पन्नबोधि सन् त्यक्त अजितसेनपुत्राय दत्त राज्य येन स । गर्भितमयम केवलमुत्पाद्याति तीर्थंकरण तथोपपत्तेर्लभ्यते ५ यशोधरगुरूपार्श्वे ६ जयसेन ७ महारुतचरः

घेऊन जयसेन राजाने तपश्चर्या केल्यावर तो सोळाव्या स्वर्गांत महाबल नामक देव झाला व महारुत अच्युत स्वर्गांत मणिकेतु नामक देव झाला.

**प्राक्[1]च्युतं बोधयत्वन्य इति ताभ्यां कृता स्थितिः ।**
**च्युत्वा महाबल[3]श्चक्री सगरोऽभूज्जिनान्वये ॥ ५ ॥**

त्या दोघा देवामध्ये असा करार झाला कीं, जो देवगतीतून प्रथम च्युत होईल त्याला राहिलेल्याने समजवावे. महाबलदेव बावीस सागरकाल पर्यंत स्वर्गसुख भोगून कौशल देशातील अयोध्यानगरींत इक्ष्वाकुवशामध्ये समुद्रविजयराजा व सुबालाराणी याच्या पोटी सगर नामें करून चक्रवर्ती जन्मला.

**चतुर्[4]मुखान्ते सख्योक्तो यतीभूय जिनालये ।**
**न बुद्धो बोधितो विप्रीभूय मायास्ततुक्शुचिः ॥६॥**

सिद्धवनात चतुर्मुख मुनीना केवलज्ञान प्राप्त झाल्यावर कल्याणमहोत्सव करण्यासाठी इन्द्रादि देव आले असता मणिकेतुदेवेहि तेथे

१ इतः स्वर्गात्प्रथम कर्मभूमिमवतीर्णं २ इहस्थः स्वर्गस्थितः ३ जयसेनचरः ४ चतुर्मुखमुनेः समीपे केवलज्ञानकल्याणं कर्तुं आगतैरिन्द्रैः सहागतेन मणिकेतुना उक्तः प्रागुक्तस्थितिः ५ तत्कारिते जिनालये तेनैव पुनुरुक्तः, पुत्रव्यामोहान्न बुद्धः । ६ पितरमभोजनप्रतिज्ञया उपरुध्य गृहीतान्निरवद्य प्रेषाद्भरतेशचैत्यालयरक्षार्थं कैलास परितो दडरत्नेन गगा खातिकीकृतवता मत्रिसम्मतेन मणिकेतुना कूरोरगीभूय मायाभस्मीकृताना तुजा षष्टिसहस्रपुत्राणा शुचि शोके सति तच्छोकाविष्टः सन्नित्यर्थः । तदा सख्या ब्राह्मणवेषं धृत्वा सगरः प्रतिबोधितः ।

आला होता व त्याने कराराप्रमाणे महाबलाच्या जीवाला ह्मणजे सगर चक्रवर्तीला आठवण दिली. पण सगर सावध झाला नाहीं. तेव्हा सुंदर तरुण यतीचे रूप घेऊन मणिकेतुदेव पुन्हा आला. त्याला सगराने विचारले असता देहाचा भरवसा नाहीं म्हणून इतक्या लवकर दीक्षा घेतली असे मणिकेतूने उत्तर दिले तरीहि मायेने पछाडलेला सगर उमगला नाही. पुढे कैलासपर्वतावर बांधलेल्या जिनालया भोंवतीं गंगेचा खंदक खणण्यास त्याने आपले पुत्र पाठविले असता मणिकेतूनें विषसर्प होऊन त्याना दंश करून मूर्च्छित केलें. तेव्हा सगर चक्रवर्ती शोकाकुल होऊन विप्रवेषधारी मणिकेतु देवाच्या उपदेशानें वैराग्य धारण करता झाला.

भगीरथे श्रियं न्यस्य स सिद्धस्तपसा सतुंक् ।
वरदत्तसुत पुत्रराज्य सोऽप्यर्चितं सुरैः ॥ ७ ॥

नंतर मणिकेतूने देवमाया काढून घेतल्यावर सगरपुत्र शुद्धीवर आले. भगीरथाला गादीवर बसवून इतर पुत्रासह सगराने दीक्षा घेतली, आणि तपश्चर्या करून सिद्धपदाला गेला. हें वृत्त ऐकून भगीरथानें आपला पुत्र वरदत्त, त्याच्या पुत्रास गादीवर बसविले व

१ पुत्रैःसह । २ भगीरथस्य पुत्रो वरदत्तो वरदत्तस्य कोऽपि पुत्रस्तस्मै भगीरथेन राज्यं दत्तं । पुत्रे राज्यं यस्य यस्माद्वा स । भगीरथः । ३ भगीरथः सम्मेदे सगरस्य मुक्तिं श्रुत्वा प्रव्रज्य गंगातटे कायोत्सर्गेण स्थितः संक्रेण क्षीरोदजलैःक्षालिताङ्घ्रिः चिरं तपः कृत्वा सिद्धः । तत्क्रमांबुज प्रक्षालनसंगमात्तदा प्रभृति गंगापि लोके तीर्थमभूत् । एतदर्चितः सुरैरित्यतो लभ्यते ।

आपणहि दीक्षा घेऊन गंगातटाकीं कायोत्सर्गपूर्वक तप आचरिले. तेव्हा इंद्राने त्याचे पूजन केल्यामुळे गंगोदकहि तीर्थ झाले. भगीरथहि सिद्धपदवीस पोहोचला.

**इति श्री अजितनाथसगरेतिवृत्तोत्तरं द्वितीयम् ॥२॥**

---

कच्छक्षेमपुरे योऽभूद्राजा विमलवाहनः।
स्वयम्प्रभजिनान्तेऽसौ प्रव्रज्यात्तान्त्यनामकः॥ १ ॥

जम्बूद्वीपाच्या पूर्वकिनाऱ्यावर विदेहक्षेत्रांत सीतानदीच्या तटाकीं कच्छ देशातील क्षेमपुरात विमलवाहन राजा राज्य करीत होता. त्याने विमलकीर्तीचे हातीं राज्यकारभार देऊन स्वयंप्रभजिनेंद्राजवळ दीक्षा घेतली. बरीच तपश्चर्या करून त्याने तीर्थकरकर्म बांधलें.

सुदर्शने विमानेऽभूद्देवो ग्रैवेयकादिमे।
ततः स्रावास्तिनगरे दृढराजाङ्गजोऽजनि॥ २॥

समाधिमरणपूर्वक शरीरत्याग केल्यावर तो पहिल्या ग्रैवेयक स्वर्गांत सुदर्शन विमानांत अहमिंद्र देव झाला. तेथून स्रावस्ती नगरीचा राजा दृढराज व राणी सुषेणेचे पोटीं तो जन्मला.

शम्भवाख्यः स दृष्ट्वाभ्रविभ्रंशत्यक्तराज्यकः।
प्राप्यार्हन्त्यं धर्मतीर्थं कृत्वा मुक्तोऽस्तु नःश्रिये॥३॥

---

१ जम्बूद्वीपस्य प्राग्विदेहस्थो देशः २ सुषेणागर्भे ३ विनाशं ४ पूर्वप्रव्रज्येति सामर्थ्याल्लभ्यते।

त्याचें नांव संभवनाथ. एकदा ढग विलयाला जात असलेले पाहून त्याना वैराग्य उत्पन्न झालें व त्यानीं पुत्राला गादीवर बसवून दीक्षा घेतली तपश्चर्या करून धर्मतीर्थ प्रवर्तित केले व ते मोक्षाला गेले ते आमचे कल्याण करोत.

इति शम्भवजिनस्य तृतीयम् ॥ ३ ॥

---

यो मङ्गलावतीरत्नसंचयेशो महाबलः ।
निर्विण्णः संयमं प्राप्य गुरोर्विमलवाहनात् ॥ १ ॥

जम्बूद्वीपात पूर्वविदेह क्षेत्रात सीतानदीच्या दक्षिणतीरावर मंगलावतीनामक देशात रत्नसंचयनामक नगरी होती. तिचा राजा महाबल. भोगोपभोगापासून विरक्त होऊन त्याने विमलवाहन मुनीजवळ दीक्षा घेतली.

एकादशाङ्गभृद्बद्धतीर्थकृत्त्वोऽहमिन्द्रताम् ।
विजये प्राप्य साकेते स्वयंवरसुतोऽभवत् ॥ २ ॥

अकरा अंगाचा तो ज्ञानी झाला व सोळा भावना भावून त्याने तीर्थंकर नाम कर्म बांधले. सन्यासपूर्वक देहत्याग केल्यावर तो विजयनामक पहिल्या अनुत्तर विमानात अहमिंद्र झाला. तेथून तो अयोध्यानगरीचा राजा स्वयंवर व राणी सिद्धार्था यांच्या पोटी जन्मला.

गन्धर्वनगरभ्रंशाद्विरज्यात्मजदत्तभूः ।
तीर्थं प्रवर्त्य मुक्तश्च स नन्द्यादभिनन्दनः ॥ ३ ॥

१ मार्गविदहस्थो देश. २ सिद्धार्थागर्भे ।

पुष्कळ वर्षें राज्यसुख भोगल्यावर एकदा त्यानें ढगाची गंधर्व नगरी विलयाला गेलेली पाहून वैराग्य धारण केले व मुलाला गादी वर बसवून दीक्षा घेतली. तपश्चर्या करून धर्मतीर्थाचे प्रवर्तन केले व मोक्षाला गेला. तो अभिनंदन सदा आनंदकारी होवो.

इति श्री अभिनन्दनार्हतश्चतुर्थम् ॥ ४ ॥

---

त्राता प्राग्धातकीखण्डमेरोः प्राक्पुष्कलावतीं ।
श्रितायाः पुण्डरीकिण्यां रतिषेणो विरज्य यः ॥१॥

अखंड धातकी खंडात, पूर्वमंदराचलाच्या पूर्वेस पुष्कलावती देशातील पुंडरीकिणी नगरींत रतिषेण नामक राजा होता. त्यांने पुष्कळ सुखे भोगल्यावर त्याला विरक्ति उत्पन्न झाली व अतिरथ नामक पुत्राला गादीवर बसवून त्याने अर्हन्नंदन मुनीजवळ दीक्षा घेतली.

निजार्हन्नन्दनाभ्यर्णे विदितैकादशाङ्गकः ।
बद्धतीर्थकरत्वोऽगाद्वैजयन्तेऽहमिन्द्रताम् ॥ २ ॥

एकादशांगाचे अध्ययन करून त्याने तीर्थंकरकर्म बांधले व सन्यासपूर्वक देहत्याग केल्यावर तो वैजयंत विमानात अहमिंद्र देव झाला.

पुंतो मेघरथायोध्यापतेर्भूत्वात्र राज्यतः ।
स्वयं विरज्य चार्हन्त्यं प्रासस्तं सुमतिं स्तुमः ॥ ३ ॥

तेथून अयोध्यानगरीचा राजा मेघरथ व राणी मंगला याच्या पोटीं

१ पूर्व. २ पूर्वविदेह. ३ त्राता. ४ द्वितीयानुत्तरे. ५ मंगलागर्भजः.

सुमतिनाथ नामे करून जन्मला. पुष्कळ वर्षे राज्य केल्यावर त्याना वैराग्य प्राप्त झाले व दीक्षा घेऊन ज्यानीं धर्मतीर्थाचे प्रवर्तन केलें त्या सुमतिनाथाची आह्मी स्तुति करतो.

इति श्रीसुमतिजिनस्य पञ्चमम् ॥ ५ ॥

---

पूर्वद्वीपे सुसीमेशो वत्सायां योऽपराजितः।
प्रव्रज्यैकादशाङ्गानि ज्ञात्वार्हत्पिहितास्रवात् ॥ १ ॥

धातकीखंड नामक द्वीपात पूर्वविदेहक्षेत्रात वत्सदेशातील सुसीमा नगरीचा राजा अपराजित नामें करून होता. त्याने पिहितास्रव मुनीजवळ दीक्षा घेऊन एकादशांगाचे अध्ययन केलें.

बद्ध्वान्त्यनामा देवोऽभूत्प्रीतिङ्करविमानजः।
ऊर्ध्वग्रैवेयके भर्तुःकौशाम्व्या धरणस्य तुक् ॥ २ ॥

तीर्थंकरकर्म बांधून तो ऊर्ध्वग्रैवेयक स्वर्गात प्रीतिंकर नामक विमानात अहमिंद्र देव झाला. तेथून कौशांबीनगरीचा राजा धरण व राणी सुसीमा याचे पोटीं तो पद्मप्रभ नामे करून जन्मला.

भुक्त्वाब्द वारिवन्धस्थं गजं श्रुत्वात्तसंयमः ॥
तीर्थं कृत्वा च निर्वाणं पातु पद्मप्रभः स नः ॥ ३ ॥

पुष्कळ वर्षे राज्यवैभव भोगल्यानंतर बांधलेल्या हत्तीस पाहून त्याना एकाएकीं वैराग्य प्राप्त झालें. दीक्षा घेऊन त्यानीं धर्मतीर्थ

१ प्राग्धातकीखंडे. २ पुत्रः सुसीमागर्भजः।

सुरू करून निर्वाणपद मिळविलें. ते पद्मप्रभ तीर्थकर आमचें रक्षण करोत.

इति श्रीपद्मप्रभस्वामिनः षष्ठम्॥ ६ ॥

---

धातकीखण्डपूर्वार्द्धे सुकच्छाक्षेमपूःपतिः ॥
नन्दिषेणोऽस्तसङ्गोऽर्हन्नन्दनाद्धतीर्थकृत् ॥ १ ॥

धातकी खंडाच्या पूर्वविदेहक्षेत्रांत सुकच्छादेशातील क्षेमपुरींत नदिषेण नावाचा राजा होता. बरीच वर्षे राज्य केल्यावर त्याला वैराग्य प्राप्त झालें व त्याने धनपाति नामक मुलाला गादीवर बसवून अर्हन्नंदन नामक मुनीजवळ दीक्षा घेतली. एकादशागाचे अध्ययन करून व षोडश भावना भावून त्याने तीर्थंकर नामकर्म बांधले.

प्राक्श्रुतज्ञः सुभद्राख्ये यो ग्रैवेयकमध्यमे ।
मध्यमेऽभूद्विमानेऽथ सुप्रतिष्ठनृपात्मजः ॥ २ ॥

पुढे तो जीव मध्यम ग्रैवेयकात सुभद्र नामक मध्यम विमानात अहमिंद्र झाला. नतर काशीक्षेत्रात सुप्रतिष्ठ राजा व पृथ्वीषेणा राणीचे पोटीं सुपार्श्वनाथ तीर्थंकर नामे करून तो जीव जन्मला.

काश्यामृतुपरावर्तान्निर्विद्यासाद्य केवलम् ।
प्रवर्त्य तीर्थं मुक्तोऽभूत्स सुपार्श्वोऽस्तु नःश्रियै ॥ ३ ॥

ऋतुपरावर्तनाचा विचार केल्यामुळे त्याना वैराग्य प्राप्त झालें

---

२ एकादशागवित् ३ पृथ्वीषेणागर्भजः ।

व दीक्षा घेऊन तीर्थप्रवर्तन केल्यावर जे मोक्षाला गेले ते सुपार्श्वनाथ तीर्थंकर आमचे कल्याण करोत.

इति श्रीसुपार्श्वजिनस्य सप्तमम् ॥ ७ ॥

---

प्राक्पुष्करार्द्धे पाश्चात्ये विदेहे श्रीपुरे नृपः ।
सुगन्धिदेशे श्रीषेणः श्रीकान्ताऽजनि तत्प्रिया ॥१॥

पूर्वपुष्करार्ध द्वीपाच्या मध्यावरील मदराचलाचे पश्चिमेस असलेल्या विदेहक्षेत्रात सुगन्धिदेशातील श्रीपुरात श्रीषेण नामक राजा होता. त्याची राणी श्रीकांता.

स्वयं मृताप्तुं निःपुत्रशोको वाचा पुरोधसः ।
जिनार्चाः सन्मणिस्वर्णैर्विधाप्याष्टाहिकार्चनम् ॥ २ ॥

त्याना पुत्र नसल्यामुळे ते फार चिंताग्रस्त होते. पुरोहिताच्या सल्लयानुसार त्यानीं रत्नजडित सुवर्ण प्रतिमा करून जिनेश्वराचा अष्टान्हिक पूजा महोत्सव केला.

कृत्वा सभार्यसिर्भक्त्या सस्नौ तद्गन्धवार्घटैः ।
ततो दर्शितसुस्वप्न श्रीवर्मासीत्तयो सुत ॥३॥

पूजेच्या गंधोदक तीर्थाने त्या दोघानीं स्नान केले. रात्रीं श्रीकांतेला हत्ती, सिंह, चद्र व लक्ष्मी स्वप्नात दिसली व पुढे तिला गर्भ राहून श्रीवर्मा नावाचा मुलगा झाला.

---

१—पश्चिम विदेहे २ श्रीषेणस्य भार्या ३ भार्यासहित. ४ स्नान चकार ।

**पित्राभिषिक्तोऽसौ राज्यं कुर्वन्निष्ट्वार्हतो निशि ।**
**उपोषितोऽग्रसौधस्थो वीक्ष्योल्कापातमापिवान् ॥४॥**

मुलासह वरीच वर्षे आनदात चालविल्यावर राजाने श्रीवर्मास गादीवर बसवून दीक्षा घेतली. पुढे श्रीवर्मा एकदा जिनपूजन करून उपवासाचे दिवशी रात्री गच्चीवर बसला असता त्याने उल्कापात पाहिला.

**निर्वेदं तपसा जज्ञे सौधर्मे श्रीधरस्तत ।**
**धातकीखण्डपूर्वार्धेऽलकानीवृति नामनि ॥ ५ ॥**
**अयोध्यायां चक्रवर्ती योऽभूदजितसेनक ।**
**ततोऽच्युते स तपसा ततस्तद्वीपपूर्वत ॥ ६ ॥**

लगेच त्याला वैराग्य प्राप्त झाल्यासुळे त्याने श्रीकात नामक पुत्राला गादीवर बसवून श्रीप्रभमुनीजवळ दीक्षा घेतली. बरेंच तप आचरून तो सौधर्म नामक पहिल्या स्वर्गातील श्रीप्रभविमानांत श्रीधर नामक देव झाला. तेथून धातकीखडात इष्वाकार पर्वताच्या पूर्वेस अलका देशातील अयोध्या नगरीचा राजा अजितंजय व राणी अजितसेना याच्या पोटी तो श्रीधर देव अजितसेन नामे जन्मला. तेथून तो सोळाव्या अच्युत नामक स्वर्गात शातिकर विमानात देवेंद्र झाला.

**विजये मङ्गलावत्यां नगरे रत्नसञ्चये ।**
**पद्मनाभो महाराजो जनित्वा श्रीधरान्तिके ॥ ७ ॥**

१ प्राप्तोः निर्वेद २ देगे ३ स चासौ द्वीपः तद्वीपः जबूद्वीपपूर्वविदेहे ४ क्षेत्रे ।

**दीक्षित्वा नाम बध्वान्त्यं वैजयन्तेऽभवत्ततः ।**
**चंद्रपुर्यां महासेननृपस्यावाप्य पुत्रताम् ॥ ८ ॥**

तेथून पूर्वेस धातकीखंडात मंगलावती देशातील रत्नसंचय नामक नगरात कनकप्रभ राजा व कनकमाला राणीचे पोटी पद्मनाभ नामे करून जन्मला. वरीच वर्षे राज्यवैभव भोगल्यानंतर वैराग्य प्राप्त होऊन त्याने श्रीधरमुनीजवळ दीक्षा घेतली व षोडश भावना भावून तीर्थंकरकर्म बांधले. नंतर तो जयंतविमानात अहमिंद्र झाला. पुढे चंद्रपुरीचा राजा महासेन व राणी लक्ष्मणा याच्या पोटीं चंद्रप्रभ नावाने तो जन्मला.

**दर्पणे वक्त्रविकृतिं मुक्त्वा दृष्ट्वा श्रियं जिनः ।**
**जनेशोऽभवत्तीर्थं स नश्चन्द्रप्रभोऽवतात् ॥ ९ ॥**

वरींच वर्षे राज्यसुख भोगल्यानंतर एकदा आरशात पाहाताना त्याना वैराग्य उत्पन्न झाले व राज्यवैभव सोडून त्यानीं दीक्षा घेतली. तीर्थप्रवर्तन करून मोक्षाला गेलेले ते चंद्रप्रभतीर्थंकर आमचे रक्षण करोत.

**श्रीवर्मा श्रीधरो देवोऽजितसेनोऽच्युताधिपः ।**
**पद्मनाभोऽहमिन्द्रोऽभूद्योऽव्याच्चन्द्रप्रभः स नः ॥ १०॥**

श्रीवर्मा श्रीधरदेव, अजितसेन, अच्युतेंद्र, पद्मनाभ आणि अहमिंद्र भवानंतर जो चंद्रप्रभ झाला तो तीर्थंकर आमचे रक्षण करो.

**इति श्रीचन्द्रप्रभस्याष्टमम् ॥८॥**

१ लक्ष्मणागर्भे. २ जीवन्मुक्तः. ३ इंद्रधरणेन्द्रचक्रेशातीर्थमभवत्. ४ अस्मान् रक्षतु.

**पुष्करार्द्धस्य पूर्वार्द्धे पुष्कलावत्यलङ्कृते ।**
**ईशिता पुण्डरीकिण्यां महापद्मो जिनाधिपात्¹ ॥१॥**

पुष्करार्ध द्वीपाच्या पूर्वेस मदराचलाजवळ पूर्वविदेह क्षेत्रात पुष्कलावतीदेशातील पुडरीकिणीनगरीत महापद्मराजा राज्य करीत होता. एकदा जवळच्या उद्यानात भूतहित नामक तीर्थंकर आले.

**श्रुत्वा भूतहिताल्लब्ध्वा² तपः स्वं तीर्थकृत्त्वभाक् ॥**
**यः प्राणतेन्द्रः सुग्रीव⁴काकन्दीशस्य सोऽत्र तुक्॥ २ ॥**

त्याच्या पासून बोध घेऊन त्याने धनद नामक पुत्रास राज्य दिलें व दीक्षा घेऊन तीर्थंकरनामकर्म बांधले. तेथून तो जीव चौदाव्या प्राणत नामक स्वर्गात इद्र झाला. नतर काकंदी नगरीचा राजा सुग्रीव व जयरामा राणीचे पोटीं पुष्पदंत नामे करून जन्मला.

**उल्कापातात्त्यक्तराज्यस्तपसा प्राप्तकेवलः ।**
**धर्मतीर्थं व्यधात्तस्मै पुष्पदन्तार्हते नमः ॥ ३ ॥**

पुष्पदंत तीर्थंकरानी बरीच वर्षे राज्य केल्यावर उल्कापात पाहून त्याना वैराग्य उत्पन्न झाले व दीक्षा घेऊन त्यानी तीर्थ प्रवर्तित करून मोक्षपद गाठले. त्या पुष्पदंत अरिहताना नमस्कार असो

**इति श्री पुष्पदन्तार्हतो नवमम् ॥ ९ ॥**

---

१ पडरीकिण्याः २ भूतहितनाम्नः ३ आध्यात्मिक ४ सुग्रीवनाम्नः काकंदीपुरीपतेः तुक् पुत्रः । जयरामागर्भे ।

द्वीपे तत्रैव वत्सायां यःसुसीमापुरीपतिः ।
पद्मगुल्मो वसन्तश्रीकान्तामृत्योःशुचातुरः ॥ १ ॥

पुष्करार्ध द्वीपातील पूर्वमंदराचलाजवळ पूर्वविदेहक्षेत्रातील वत्सदेशांत सुसीमा पुरीचा पद्मगुल्म नामक राजा होता. तो वसंत श्रीनामक राणीवर फार प्रेम करीत असे. तिच्या मृत्युमुळें तो शेवटीं कष्टी झाला.

स नन्दसूरेःस्वीकृत्य तपस्तीर्थंकरत्वसुक् ।
भूत्वारणेन्द्रो मलये राजभद्रपुरेऽभवत् ॥ २ ॥

तिच्या मरणानंतर उद्विग्न होऊन त्याला वैराग्य उत्पन्न झालें व त्यानें आपल्या चंदन नामक पुत्राकडे राज्यकारभार सोंपवून आनंद मुनीजवळ दीक्षा घेतली. पुढें योग्य तपश्चर्या करून त्यानें तीर्थंकरनामकर्म बांधलें. तेथून पंधराव्या आरण नामक स्वर्गांत इंद्र होऊन मलय देशांतील भद्रपुरचा राजा दृढरथ व राणी सुनंदा यांच्या पोटीं जन्मला.

सुतो दृढरथस्यायं हिमानीविलयात्तपः ।
श्रित्वा तीर्थं प्रवर्त्यागाच्छिवं जीयात्स शीतलः ॥३॥

या शीतलनाथ तीर्थंकरांनीं बरींच वर्षे राज्यसुख भोगल्यावर एकदा सर्वत्र हिम पसरलेलें व तें एकाएकीं विलयाला गेलेलें पाहून त्यांना वैराग्य उत्पन्न झालें. दीक्षा घेऊन त्यांनीं तपश्चर्या केली व धर्मतीर्थाचें प्रवर्तन करून मोक्षपद गाठलें. ते शीतलनाथ चिरायु होवोत.

१ पुष्करार्धे २ मरणात् ३ सुतः तपः ४ दृढरथस्य, सुनंदागर्भजः ।

**कन्याभूगोऽश्वदासीभरथहेमतिलौकसाम् ।**
**दानं तेनेऽस्य तीर्थान्ते मुण्डशालायनो द्विजः॥ ४ ॥**

शीतलनाथ तीर्थकरानतर मलयदेशात भद्रिलपुरींत मेघरथ राजा राज्य करीत होता. त्याचा मत्री सत्यकीर्ति सम्यक्त्वी होता. राजाने एकदा कोणते दान श्रेष्ठ ह्मणून विचारले असतां जैनशास्त्रानुसार त्याने सागितले कीं, शास्त्रदान, अभयदान व अन्नदान असे उत्तम, मध्यम व कनिष्ट असे दानाचे तीन प्रकार आहेत. राजाचे दरबारांत भूतिशर्मा ब्राह्मणाचा मिथ्यात्वी पुत्र मुडशालायन नामक होता. तो ह्मणाला कीं, कन्यादान, गजदान, सुवर्णदान, अश्वदान, दासीदान, गोदान, तिल्दान, पृथ्वीदान, रथदान, व गृहदान अशीं दहाप्रकारचीं दाने आहेत. काळप्रभावानुसार राजाला मिथ्यात्वमताची ही दहा प्रकारचीच दाने रुचली.

**॥ इति श्रीशीतलनाथस्य दशमम् ॥**

---

**मौंचि द्वीपे सुकच्छाख्ये देशे क्षेमपुरे नृपः ।**
**नलिनप्रभ इत्यासीत्सोऽनन्तजिनतस्तपः ॥ १ ॥**

पुष्करद्वीपात मंदराचलाजवळ पूर्वविदेहक्षेत्रातील सुकच्छदेशात क्षेमपुर नावाचे नगर होते. तेथें नलिनप्रभ नावाचा राजा राज्य

१ शीतलस्य २ मलयदेशे भद्रिलपूरे मेघरथराजस्य प्रश्नाज्जैनेन सत्यकीर्तिमंत्रिणा शास्त्रादिदानेषु बहुसमर्थितेषु अपि कपोतलेश्यावशादमन्यमानस्य सभाया कन्यादिदानानि मिथ्याशास्त्र प्रदर्श्य विस्तारयामास । तदैव सद्धर्मनाशादेवं अधर्मतीर्थादतरातरा तन्नाशश्चिंत्यः ॥ ३ पुष्करार्द्धस्य पूर्वार्द्ध प्राग्विदेहे ।

करीत होता. एकदा सहस्राम्रवनात अनंतजिनेंद्र आले असता त्यांची वाणी ऐकून राजाला उपरति झाली. त्याने दीक्षा घेतली व तप आचरिलें.

स्वीकृत्य तीर्थकृन्नाम बद्ध्वागादच्युतेन्द्रताम् ।
पुष्पोत्तरविमानेऽत पैत्र सिंहपुरेशितु ॥ २ ॥

षोडशभावना भावून त्याने तीर्थंकरनामकर्माचें बंधन केलें व सोळाव्या पुष्पोत्तर विमानात अच्युतेंद्र झाला. तेथून तो सिंह-पुरचा राजा विष्णु व राणी नंदा यांच्या पोटीं जन्मला.

विष्णोर्भूत्वाऽत्र मुक्तश्रीर्वसन्तपरिवर्तनात् ।
धर्मं प्रणीय निर्वाण स श्रेयान् श्रेयसेऽस्तु नः ॥३॥

श्रेयांसनाथ तीर्थंकरांनी वरीच वर्षे राज्य केल्यावर एकदा वसंत ऋतु गेलेला पाहून त्यांना उपरति झाली व त्यांनीं दीक्षा घेऊन तपश्चर्या केली पुढे धर्मतीर्थ चालू करून ते निर्वाणाला गेले. ते श्रेयांसनाथ आम्हाला कल्याणकारक होवोत.

पातो राजगृहं दत्तं भ्रात्रीयो विश्वभूतिना ।
विशाखभूतेर्यवीयान्विश्वनन्दी तदौक्तजः ॥ ४ ॥

राजगृहनगरीचा विश्वभूति राजाने विशाखभूति नामक धा-कट्या भावाकडे राज्यकारभार सोपवून दीक्षा घेतली. त्याला वि-शाखनंदी नामक पुत्र होता व त्या विश्वभूतीचा पुत्र विश्वनंदी.

१ नंदा गर्भज. २ त्यक्तराज्यलक्ष्मीक. ३ तीर्थं कृत्वा ४ रक्षां कुर्वतः ५ विश्वभूतेरनुजस्य ६ युवराजो जात. । ७ विशाखभूतिपुत्र ।

**विशाखनन्दिनः स्वात्तवन भंक्त्वानुगृह्य तम् ॥**
**सपितृव्यस्तपः कुर्वन्मासक्षणपारणे ॥ ५ ॥**

विश्वनंदीनें उत्तम बगीचा बनविला होता. तो जबरदस्तीने विशाखनंदीने घेतला. अर्थात् दोघामध्ये भाडण जुंपले. राजाने पुतण्याचाच पक्ष घेतला तेव्हा मुलगा पळून गेला. त्यामुळे विश्वनंदीला उपरति उत्पन्न झाली व त्याने आपल्या काकासह संभूतमुनीजवळ दीक्षा घेतली. पुढे विश्वनंदी महिन्याचे अनशनव्रत आचरून पारणे करण्यासाठी मथुरा नगरीत गेला.

**प्रविष्टो मथुरां धेन्वा पातितः क्व सविक्रमः ।**
**इति तेनो पहासितो वेश्यासौधाग्रवर्तिना ॥ ६ ॥**

बापाला व चुलत भावाला की जो गादीचा खरा वारस होता अशा दोघाना राज्य सोडून जाण्यास कारणीभूत झाला ह्मणून प्रजेने त्या दुराचारी विशाखनदीला आमात्य वगैरेनीं हकलून दिले होते. तो नगरींतच वेश्येच्या घरी होता. विश्वनंदिमुनि रस्त्याने चालले असता गाईचा धक्का लागून खालीं पडले ते वेश्येच्या गच्चीवरून विशाखनदीने पाहिले व विश्वनदीस ओळखून ह्मणाला, 'कुठे आहे तो तुझा पराक्रम ?'

१ स्वेभ्यो वनपालेभ्य आत्त बलाद्गृहीत वन येन । स्वपिता विश्वनदिनं कामभूपराजमपराध्यन्त निर्जेतुं प्रस्थाप्य वनपालानभिभूय गृहीत नदनोपमतन्नदवन २ सग्रामे तदाश्रयान्स्वयमुत्पाटितकपित्थवृक्षान्नाशयित्वा अनुगृह्य त शिलास्तभमाश्रित्य स्थित तलप्रहारेण ट पातयित्वा दिष्टीदत मा भैषीरिति समाश्वास्य राज्य तद्वन च दत्वा प्रव्रज्या गृहीत्वा ३ पुत्राय राज्य दत्वा प्रव्रजितेन पितृव्येणसह सभूतगुरुसंनिधौ तपस्यन् । ४ दुराचारत्वादमात्यादिभी राज्यान्निर्द्धाटितेन जनस्य विगतेर्शीभूय तत्रागतेन ।

क्रोधान्निदानं तद्घाते कृत्वाप सपितृव्यक ॥
महाशुक्रं ततश्च्युत्वा पौदनेशः प्रजापतेः ॥ ७ ॥

त्याने टोचून बोललेले ऐकून विश्वनंदिमुनीला राग आला व तेथेच तो मरण पावून महाशुक्रनामक स्वर्गात देव झाला. विशाखभूतिहि त्याच स्वर्गांत देव झाला होता. पोदनपुरचा राजाप्रजापति व राणी मृगावती यान्च्या पोटी त्रिपृष्टनावानें विश्वनंदी जन्मला.

पुत्र पितृव्यो विजयो वलोऽभूदितरो हरिः ।
त्रिपृष्टो जितसिंहोऽतो भवे भ्रान्त्वा पुरा रिपुर्म् ॥८॥

विशाखभूतीचा जीव राजा प्रजापति व राणी जयवती याच्या पोटी विजय नावाने जन्मला. या प्रमाणें चुलते पुतणे सावत्र भाऊ झाले.

त जातमलकाधीशमश्वग्रीवार्द्धचक्रिणाम् ॥
हत्वा स्वयम्प्रभाहेतोस्त्रिखण्डाम्भरतावनिम् ॥९ ॥
भुक्त्वागात्सप्तमीं सोरिर्बह्वारंभपरिग्रहः ।
त्रिपृष्टो भूमिमस्तारि विजय पुनरष्टमीम् ॥१०॥

विशाखनंदी अलकापुरीचा राजा अश्वग्रीव याच्या पोटीं जन्मला. त्रिपृष्ट व विजय पूर्वी बलभद्रनारायण होते. त्यानीं अश्वग्रीला मारुन त्रिखण्डपृथ्वी पादाक्रांत केली होती. स्वयप्रभाराणी खातर त्रिपृष्टानें

---

१ विशाखभूतिचर २ विश्वनन्दिचरः ३ एकदा प्रजोपद्रवकारिण सिंह हत्वा स्थित ४ विशाखनन्दिन । ५ महातमःप्रभानरकं भुव ६ अष्टमीस्वर्गात्. ७ मुक्तिलक्षणा भूमिमगात् ।

पुष्कळ पापाचरण केले व शेवटी महातमः प्रभा नांवाच्या सातव्या नरकांत गेला. अश्वग्रीवाचा जीवहि त्याच नरकांत गेला. विजयानें विरक्त होऊन दीक्षा घेतली व मोक्षास गेला.

**इति श्रीश्रेयन्स्तीर्थंकराश्वग्रीव प्रतिवासुदेव विजयबलदेव त्रिपृष्ठवासुदेवेतिवृत्तोत्तर मेकादशम् ॥११॥**

---

**प्राग्द्वीपे वत्सकावत्यां यो रत्नपुरपालकः ।**
**पद्मोत्तरोऽभूच्छ्रमणो युगन्धरजिनाश्रयात् ॥ १ ॥**

पुष्करार्धद्वीपाच्या पूर्वेस मेरुपर्वताजवळ वत्सकावती देशांतील रत्नपुरात पद्मोत्तर नामक राजा राज्य करीत होता. एकदा मनोहर-पर्वतावर युगंधर तीर्थंकर आले असता त्याच्याजवळ राजाने दीक्षा घेतली.

**प्राप्तान्त्यनामा शक्रोऽथ महाशुक्रेऽथ नन्दनः ।**
**वसुपूज्यस्य देशेऽङ्गे चंपायां सोऽसंयमम् ॥२॥**

त्याने सोळा भावनाचे चिंतन करून व तप आचरून तीर्थं-करनामकर्म बांधले. तेथून तो महाशुक्रनामक विमानात इंद्र झाला. नंतर चंपानगरचा राजा वसुपूज्य व राणी जयावती यांच्या पोटीं तो वासुपूज्यनामे करून जन्मला.

---

१ पुष्करार्धपूर्वशैल प्राग्विदेहे २ अभूत् ३ जयावतिगर्भजः ४ यथाख्यातचारित्र प्राप्य निर्ववौ ।

कुमार एव ससार तत्वादध्यानादुपेत्य च ।
निर्वैर्वो तीर्थकृद्देयात्स श्रियं वासुपूज्यैताम् ॥ ३ ॥

कुमार असतानाच त्याना वैराग्य प्राप्त होऊन त्यानीं दीक्षा घेतली. तपश्चर्या करून तीर्थ प्रवर्तित केले व मोक्षाला गेले.

विन्ध्यशक्तिनृपो विन्ध्यपुरेऽभूदत्र भारते ।
सुषेणस्याथ कनकपुरेशो गुणमञ्जरीम् ॥ ४ ॥

या भरत खडात मलयदेशातील विंध्यपुरात विंध्यशक्ति नामक राजा राज्य करीत होता. त्याचवेळीं कनकपुरात सुषेणराजा राज्य करीत होता. त्याच्याजवळ गुणमजरी नामक नर्तकी होती.

नर्तकीरत्नकमाकर्ण्य चराद्दूतेन याचितम् ।
अददानमवस्कन्द्य तं जित्वाजौ तदग्रहीत् ॥ ५ ॥

त्या नर्तकीरत्नाची कीर्ति ऐकून विंध्यशक्तीने तिला आपणाकडे पाठविण्यासाठी सुषेण राजाकडे दूत पाठविला. त्यानें तिला पाठविण्याचे नाकारल्यामुळे युद्ध करून विंध्यशक्तीने नर्तकी आणली

तन्मानभङ्गान्निर्विद्य सुषेणः सुव्रताज्जिनात् ।
महापुरेशिना वायुरथेनामाचरत्तपः ॥ ६ ॥

मानभग झाल्यामुळे सुषेणराजा खिन्न झाला त्यावेळीं सुव्रत जिनेंद्राजवळ महापुरच्या वायुरथराजासह दीक्षा घेऊन तपश्चर्या केली.

१ प्राप्य २ मुक्तोऽभूत ३ वासुपूज्यस्यभावं. वासुपूज्यता ता वासुपूज्य सुधर्मिणा ४ धार्टीरन्वा ५ त सुषेण । ६ महापुराल्यपुरस्वामिना ।

**विमानेऽनुत्तरे वायुरथोऽभूत्प्राणते प्रभुः ।**
**निदानिकोऽन्योऽनुपमे देवो द्वारावतीपतेः ॥ ७ ॥**

वायुरथमुनि प्राणतस्वर्गातील अनुत्तरविमानांत इंद्र झाला. तेथून तो अनुत्तरविमानेश द्वारावतीचा राजा ब्रह्मा व राणी उषा यांच्या पोटीं द्विपृष्ठ नावानें जन्मला.

**तुग्ब्रह्मणोऽचलाख्योऽभूत्पूर्वो रामःपरो हरिः ।**
**द्विपृष्ठाख्यो भवे भ्रान्त्वा भोगवर्धनपूःपतिम् ॥ ८ ॥**

सुषेणराजाचा जीव राजा ब्रह्म व राणी सुभद्रेच्या पोटीं अचल नांवाने जन्मला. हे दोघे बलभद्र व नारायण होते. विंध्यशक्तीनें भोगवर्धननगरचा राजा श्रीधर याचे पोटीं तारक नांवानें जन्म घेतला.

**तारकाख्यं प्रतिहरीभूतं गन्धेभयाचिनम् ।**
**हत्वारिं सोऽवधिस्थानं तेनोमागाद्बलःशिवम् ॥ ९ ॥**

तारक प्रतिनारायण होता. तारकाने द्विपृष्ठ व अचल याच्याकडे असलेला प्रख्यात हत्ती मागविला. तो त्यांनीं न पाठविल्यामुळें तारकाने त्याच्याशी युद्ध केले पण तो त्यात मारला जाऊन सातव्या नरकात गेला. द्विपृष्ठहि त्याच नरकांत गेला. अचलनें मात्र यामुळें विरक्त होऊन दीक्षा घेतली व तो मोक्षाला गेला.

१ स्वर्गे २-३ विंध्यशक्तिघाते कृत निदानः सुषेणः प्राणतस्वर्गेऽनुपमे विमाने ४ ब्रम्हणस्तुक पुत्रः ५ पूर्वो वायुरथचरः ६ परः सुषेणः ७ विंध्यशक्तिचर ८ द्विपृष्टः ९ सप्पमं नरक १० रिपुणासहः ।

**इत्याशाधरहब्धे त्रिषष्टिस्मृतिनाम्नि महापुराणान्तस्तत्वसङ्ग्रहे श्रीवासुपूज्यतारकप्रतिकेशवाचलाख्यबलद्विपृष्टाख्यकेशवेतिवृत्तोतरं पुराणं द्वादशम् १२**

---

**प्रतीच्य धातकीखण्डेमेरुमत्याग्विदेहगे ।**
**विषये रम्यकावत्यां यो महानगरेऽधिराट् ॥ १ ॥**

धातकी खंडात मेरु पर्वताच्या पश्चिमेस रम्यकावती देशातील महानगरात पद्मसेन नामक राजा राज्य करीत होता.

**पद्मसेनस्तपः सर्वगुप्तकेवलिसन्निधौ**
**गृहीत्वैकादशाङ्गज्ञस्तीर्थकृन्नाम बद्धवान् ॥ २ ॥**

त्याने प्रीतिकरवनात सर्वगुप्तकेवली आले असता त्याच्या जवळ दीक्षा घेतली. एकादशांगाचे अध्ययन करून तीर्थंकर नाम कर्म बांधिले

**सहस्रारेऽथ शक्रोऽभूत्ततः काम्पिल्यपत्तने ।**
**कृतवर्मनृपस्याभूत्सुतो हेमन्तसम्पदाम् ॥ ३ ॥**

तेथून तो सहस्रार नामक बाराव्या स्वर्गात इंद्र झाला. पुढें कांपिल्य नगरीचा राजा कृतवर्मा व राणी जयश्यामा याच्या पोटी विमलनाथ नावानें जन्मला.

**विलीनां वीक्ष्य निर्ग्रन्थी भूय ध्यानाप्तकेवलः ।**
**धर्मं प्रणीय सिद्धस्तं स्तुवे विमलवाहनम् ॥ ४ ॥**

---

१ पश्चिमः । २ जयस्यामागर्भजः ।

एकदा हेमंतऋतूंतील सृष्टिशोभा क्षणार्धात नष्ट झालेली पाहून विमलनाथाना वैराग्य उत्पन्न झाले व त्यानी निर्ग्रंथ बनून तपश्चर्या केली व धर्मतीर्थ चालू करुन सिद्धपदाला ते गेले. त्या विमलवाहन तीर्थंकराची मी स्तुति करतो.

योऽत्रापरविदेऽभूच्छ्रीपुरे नन्दिमित्रराट् ।
स सुव्रतव्रतमुनेः प्राप्त व्रतोन्त्यानुत्तरं गतः ॥ ५ ॥

याच भरतखंडाच्या पश्चिमविदेहक्षेत्रातील श्रीपुरात मित्रनंदी नामक राजा होता. एकदा तो सुव्रतनाथतीर्थंकरांच्या दर्शनास गेला असता त्यांची बोधवाणी ऐकून विरक्त झाला व तप आचरून सर्वार्थसिद्धि नामक स्वर्गातील अनुत्तरविमानात अहमिंद्र झाला.

भरतेऽस्मिन्कुणालाख्ये देशे स्रावस्त्यधीश्वरः ।
सुकेतुर्भोगसक्तोऽभून्निषिद्धोऽप्यसकृद्धितैः ॥ ६ ॥

या भरत क्षेत्रातील कुणाल देशात श्रावस्ती नामक नगरींत सुकेतु नामक राजा राज्य करीत होता. तो फार भोगासक्त होता. त्याचे नातलग, मंत्री व प्रजाजन त्याचा फार निषेध करीत.

द्यूतं दीव्यन्सवल्याख्य हारिताशेषवस्तुकः ।
सुदर्शनाचार्यवाचातप्स्यत्र तपसामुना ॥ ७ ॥

द्यूतादिव्यसनांत त्याचे सर्वस्व गमावले. तेव्हां पश्चात्तापा पावून त्यानें सुदर्शनाचार्यांच्या जवळ दीक्षा घेतली व तप आचारिले.

---

१ मंत्रिबंधुवरैः २ राष्ट्रवित्तबलदेवी प्रभृति ३ भवयमहं दीक्षा ग्रही ष्यामिचेन्मम न दाया न पतिष्यति ।

सबलाधुद्धं इत्यात्तनिदानो लान्तवङ्गतः ।
तावभूतां सुतौ भद्रनाम्नो द्वारवतीपतेः ॥ ८ ॥

या तपानें कला, गुण, चातुर्य व बल प्राप्ती होवो असें निदान बांधून तो लांतवस्वर्गांत देव झाला. तेथून द्वारावती नगरीचे राजा रुद्र व राणी पृथ्वी याच्या पोटी तो स्वयंभू नावाने जन्मला

धर्मस्वयम्भूनामानौ रामविष्णू अथैकदा ।
मधुर्बलिचरः सोऽर्द्धचक्री वरपुरेशिना ॥ ९ ॥

मित्रनंदीराजा अहमिंद्रभवातून रुद्रराजाच्या सुभद्राराणीचे पोटीं धर्म नामें करून जन्मला. धर्म बलदेव होता व स्वयंभू वासुदेव होता. ज्याने द्यूतात सुकेतूला जिंकले होते तो राजा यावेळीं रत्नपुरचा मधु नामक राजा झाला होता. तो प्रतिवासुदेव होता.

केनापि प्रहित राज्ञा प्राभृतं दूतयोस्ततः ।
स्वयम्भुवा हृतं श्रुत्वा नारादात्तज्जिघांसया ॥१०॥

मधुराजाकडे दुसऱ्या राजाकडून कांहीं भेट घेऊन जाणाऱ्या दोन दूतांना स्वयंभूने ठार मारून भेट हिरावून घेतली. तें वर्तमान ऐकून मधु त्या बलदेव व वासुदेवाबरोबर लढण्यास गेला.

मुक्तचक्रोहतस्तेन सप्तमीं भुवमाविशत् ।
पश्चात्स्वयम्भूश्चाधर्मादूर्ध्वं धर्मः सुनिर्वृतः ॥११॥

१ बलात्कारेण युध्धे पश्चात्सुकेतुना दीक्षा गृहीता २ नंदिमित्रसुकेतू द्वौ ३ नात ४ द्वयोर्दूतौ निहत्य ५ तयोर्धर्मस्वयम्भुवोर्हन्तुमिच्छया ६ मधु. ७ स्वयंभुवा ८ सप्तमीमाविशत् ९ मोक्ष गतः ।

त्या युद्धांत स्वयंभूनें सोडलेल्या चक्राने मधुराजा मारला गेला व तो सातव्या नरकात पडला. स्वयंभूसुद्धा त्याच नरकांत गेला. त्यामुळे व्यथित होऊन धर्मबलदेवाने दीक्षा घेऊन मोक्षपद गाठलें.

**मधुरारामदत्तादिभवौ मेरुश्चमन्दरः ।**
**वारुणीपूर्णचन्द्रादिभवौ विमलसङ्घपौ ॥ १२ ॥**

याचकाळात श्रीविमलतीर्थकरांचे मेरु व मंदर नामक दोन गणधर होते. त्याची भवावली अशी—कौसल देशांतील वृद्ध नामक गावांत मृगायण नावाचा एक ब्राह्मण होता. त्याच्या बायकोचें नांव मधुरा. हिचाच जीव पुढें मेरुगणधर झाला. या ब्राम्हण दांपत्याला वारुणी नामक मुलगी झाली. हिचा जीव पुढे मंदरगणधर झाला. मधुराब्राम्हणी मेल्यानंतर रामदत्ता राणी झाली. ही सिंहसेन राजाची पत्नी. हिनेंच सुभूतिमंत्र्याने भद्रमित्र शेठची बळकावलेली रत्नमंजूषा मोठ्या युक्तीनें शेठला मिळवून दिली. ही राणी मेल्यानंतर महाशुक्रस्वर्गात देव झाली. तेथून ती धरणीतिलकनगरचा राजा मतिवेग व राणी सुलक्षणा याच्या पोटीं श्रीधरानामें करून जन्मली. श्रीधरा पुढे अर्जिका बनली व मेल्यावर आठव्या कापिष्ठ स्वर्गांत देवी झाली. पुढे पृथ्वीतिलक नगरीचा राजा मतिवेग व राणी प्रियाकरिणी यांच्या पोटीं ती रत्नमाला नामें करून जन्मली. नंतर तो जीव स्वर्गांत अच्युत देव झाला. तेथून

१ मेरुभवः २ रामदत्तादिभवो यस्य मेरोः सः ३ पुनः श्रीविमलनाथगणधरौ जातौ ।

तो जीव अयोध्यानगरीचा राजा अर्हद्दास व राणी सुव्रता याच्या पोटीं वीतभय नामें करून जन्मला. हा बलदेव मेल्यानतर लांतव-स्वर्गांत आदित्याभ नामक देव झाला. हाच देव उत्तरमथुरानगरीचा राजा अनतवीर्य व राणी मेरुमालिनी यांचे पोटीं मेरु नावानें ज-न्मला व विमलनाथ तीर्थकराचा गणधर झाला. मधुराब्राह्मणीची मुलगी वारुणी मेल्यानतर तिच्या रामदत्ताभवात तिचा पूर्णचद्र नामक मुलगा होऊन जन्मली. पूर्णचद्र दीक्षा घेऊन वारल्यावर वैडूर्यदेव झाला. नतर मधुरेच्या श्रीधराभवात तो देव यशोधरा नामें करून जन्मला. तिचे सूर्यावर्ताशीं लग्न झालें व त्याना रश्मिवेग नामक मुलगा झाला. यशोधरा अर्जिका होऊन मेल्यानतर आठव्या कापिष्ट स्वर्गात देवी झाली. मधुरेच्या रत्नमालाभवात ही देवी रत्नायुधनामक पुत्र होऊन तिला जन्मली. अयोध्येचा राजा अर्हद्दास व राणी जिनदत्ता याच्या पोटी पुढे रत्नायुध मेल्यानंतर विभीषण नावानें जन्मला. हा नारायण मेल्यावर दुसऱ्या नरकात गेला. तेथून तो अयोध्येचा राजा श्रीवर्मा व राणी सुसीमा याचे पोटीं श्रीधाम नावानें जन्मला. दीक्षा घेऊन तो मेल्यानतर पाचव्या ब्रह्म नामक स्वर्गात देव झाला. वीतशोकपुरचा राजा वैजयत व राणी सर्वश्री याच्या पोटी तो देव जयत नावानें जन्मला. पुढें तो धरणेंद्र झाला. नंतर हा धरणेंद्र उत्तरमथुरानगरीचा राजा अनंतवीर्य व राणी अमितमती याच्या पोटी मदर नामें करून जन्मला व विमलनाथ तीर्थकराचा गणधर बनला. याप्रमाणें हे दोन गणधर

मागील भवांत सावत्र भाऊच होते. वारुणीचा जीव बारा जन्मानन्तर मंदर झाला आणि मधुरेचा जीव आठ जन्मानन्तर मेरु गणधर झाला.

जातौ सूच्येत तद्वृत्तं भरतेऽत्र खगाद्रेपाक् ।
आनीय गन्धमालिन्या नदीपञ्चकसङ्गमे ॥ १३ ॥

वैजयतमुनि वनांत प्रतिमायोग धारण करून बसले असता विद्युद्दष्ट्र नामक विद्याधराने पूर्वजन्मीचे वैर स्मरून त्यानां भरतक्षेत्रातील विजयार्द्धपर्वताच्या पूर्वेस गधमालिनीदेशात असलेल्या कुसुमवती, हरिवती, सुवर्णवती, गजवती आणि चंडवेगा या पाच नद्याच्या सगमांतील खोल पाण्यात आणून टाकले.

क्षिप्त्वा प्राग्वैरतो विद्युद्दंष्ट्रखेटेन मारितः ।
खेटैस्तदीडितश्चान्यैः सञ्जयन्तः सुधीर्मुनिः ॥ १४ ॥

त्याला इतर विद्याधरानींहि मदत केली.

तत्कल्याणेऽहिराड्भूतो निदानादागतोऽनुजः ।
तस्याङ्गं वीक्ष्य रुष्टोरिं सम्बन्धु हन्तुमुद्यतः ॥१५ ॥

सजयत मुनीचा भाऊ जयत धरणेद्र आपल्या भावाला झालेली पीडा पाहून विद्युद्दंष्ट्राला सर्व बाधवासह समुद्रात बुडवून मारु लागला.

१ तयोर्मेरुमदरयोः २ जबूद्वीपापरविदेहस्थविजयार्द्धं ३ दक्षिणतः सकाशादानीय अपाक् शब्दोऽत्राव्ययः । ४ श्रीभूतिभवे सिंहपुरे सिंहसेन राज्ञेन बद्धात् । ५ श्रीभूतिचरेण ६ स चासो ईडितस्तदीडितः ७ सिंहसेन राजचरः ८ धरणेंद्रत्व प्राप्तः ९ जयतनामा १० नागपाशेन बद्ध्वा समुद्रे क्षेप्तुं ।

**आदित्याभसुरेणोक्त्वा सत्यघोषादिवृत्तकम् ।**
**वारितो मन्दराख्योऽभूद्गणी मेरुश्च स क्रमात् ॥१६॥**

रामदत्तेने रत्नमंजूषा भद्रमित्र शेठला परत दिली व श्रीभूति उर्फ सत्यघोष मन्त्र्याची लबाडी बाहेर आणल्यावर सिंहसेन राजानें त्याला शिक्षा दिली होती. त्यामुळें तो त्याचा वैरी बनला होता. मेल्यानंतर तो मंत्री अगंधन नामक सर्प झाला. मेल्यावर तो तिसऱ्या नरकात गेला. तेथून चमरहरिण झाला. पुढे कुक्कुट-सर्पयोनींत गेला नंतर पुन्हा तिसऱ्या नरकात जाऊन अजगरयोनींत जन्मला. नंतर तो भिल्ल झाला. तेथून तो भरतक्षेत्रातील भूतरमन नामक वनात गोशृंग तापसी व त्याची बायको सखिया याच्या पोटीं मृगशृंग नावाने जन्मला. त्यानें पंचाग्नि साधन केले व विद्याधरवैभव पाहून ते निदान केलें. त्यामुळें तो वज्रदंष्ट्र व विद्युत्प्रभा या विद्याधर जोडप्यापासून विद्युद्दंष्ट्र नामकरून जन्मला. राजा सिंहसेन मेल्यानंतर अशनिघोषनामक हत्ती झाला तो मरून नंतर श्रीधरदेव, रश्मिवेग, अर्कप्रभ वगैरे जन्म घेऊन चक्रपुरचा राजा चक्रायुध व राणी चित्रमाला यांच्या पोटीं वज्रायुधनामे करून जन्मला. अशनिघोष हत्तीला विद्युद्दंष्ट्रानेंच सर्पभावात दंश करून मारले होते. ते राजा वज्रायुध मुनि होऊन प्रतिमा योग धारण करून तपश्चर्या करीत असता विद्युद्दंष्ट्रानें भिल्ल-

१ रामदत्ता चरेण २ निषिद्धः ३ आदित्याभसुरः मेरुरभूत् चकाराज-ग तो मन्दरोऽभूत् ।

भवात त्याना ठार मारले होते. तेव्हां तो जीव सर्वार्थसिद्धिस्वर्गात अहमिंद्र झाला व नंतर सजयंत झाला. अशा रीतीने संजयंतमुनि व विद्युद्दंष्ट्राचे भवोभवींचे वैर असल्यामुळे विद्युद्दंष्ट्रानें मुनिला विनाकारण संगमात बुडविले असे धरणेंद्राला आदित्यादेवाने सत्यघोष व सिंहसेन भवापासून इत्तीवृत्त सागून समजाविल्यावर तो स्वस्थ झाला.

**इति श्रीविमलनाथधर्मस्वयंभूमधुवृत्तगर्भसञ्जयन्तमेरुमन्दरचरितोत्तरं त्रयोदशम् ॥ १३ ॥**

**राजा प्राग्धातकीखण्डकच्छकावत्यवास्थितः ।**
**पुरे पद्मरथोऽरिष्टे यः श्रित्वार्हत्स्वयंप्रभात् ॥ १ ॥**

धातकीखंड द्वीपात मेरुपर्वताजवळ कच्छकावती देशात अरिष्ट नामक गावचा राजा पद्मरथ स्वयंप्रभ तीर्थंकराजवळ दीक्षा घेऊन त्याचाच आश्रय करता झाला.

**तपो बध्वा तीर्थकृत्त्वं भुक्त्वाच्युतरमांच्युतः ।**
**साकेते सिंहसेनस्य पुत्रोभूय विरज्य च ॥ २ ॥**

बरीच तपश्चर्या करून त्याने तीर्थंकरनामकर्म बांधले व सोळाव्या अच्युतस्वर्गात पुष्पोत्तर विमानात देव झाला तेथून तो अयोध्येचा राजा सिंहसेन व राणी जयश्यामा यांच्या पोटीं अनंतनाथ नामे करून जन्मला बरीच वर्षें राज्य करून त्याने दीक्षा घेतली.

---

१ श्रित्वा आश्रित्य । २ षोडशस्वर्गजा लक्ष्मीं ३ जयश्यामाया ।

उल्कापातेक्षणाज्जात कैवल्यस्तीर्थकृत्सताम् ॥
प्राग्योऽनन्तरपदम्प्राप्यात्मनः पायादनन्तजित् ॥३॥

एकदा उल्कापात पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झाले व दीक्षा घेऊन त्याने तपश्चर्या केली व सर्वज्ञ बनून सज्जनात श्रेष्ठ झाला. धर्मतीर्थ प्रवर्तित करून जे मोक्षाला गेले ते अनतनाथ तीर्थंकर आमचे रक्षण करोत.

वसुषेण पौदनेऽस्मिन्नृपो नन्दास्य वल्लभा ॥
तां वीक्ष्य मलयाधीशस्तन्मित्रं चण्डशासनः ॥ ४ ॥

याच भरत क्षेत्रातील पौदानपुरात राजा वसुषेण व राणी नदा राज्य करीत होती. मलयदेशचा राजा चडशासन हा सुषेण-राजाचा मित्र होता. नदाराणीला पाहून तो मोहित झाला.

कामार्तो हृतेतद्भर्ता शोकार्तः सम्प्रबोधितः ॥
श्रेयोगणं नुत्य कृत्वा सिंहनिःक्रीडितं तपः ॥ ५ ॥

कामपीडित झालेल्या चडशासनाने तिला पळवून नेली तेव्हा राजा वसुषेण फार कष्टी झाला. पण त्याचा निरुपाय होता म्हणून त्याने जागे होऊन श्रेय नामक गणधराजवळ दीक्षा घेतली व सिंहनि:क्रीडित नामक घोर तप त्याने आचरिले.

१ सत्पुरुषाणा मध्ये प्राग्ज्येष्ठः । २ वसुषेणस्य भार्या नदा ३ नदा ४ तस्य वसुषेणस्य ५ उपायेन ता हृत्वा स्वपुर गतः ६ वसुषेण. ७ प्रबोधो जातो यस्य सः प्रबोधित ८ नुत्वा ।

**ततो निदानतोऽगच्छत्सहस्रारं परास्थितिः ॥**

**प्राग्विदेहे नन्दनेऽभूत्पुरे राजा महाबलः ॥ ६ ॥**

मी पुढील जन्मात बलिष्ठ राजा व्हावे असे निदान बांधून वसुषेण मुनि मेल्यावर बाराव्या सहस्रार नामक स्वर्गात देव झाला. पूर्वविदेहक्षेत्रात नंदनपुरात राजा महाबल राज्य करीत होता.

**सोऽपि तद्वत्तपः कृत्वा प्रजापालार्हदन्तिके ॥**

**शान्तस्तत्रैव देवोऽभूत्ततश्च्युत्वाऽभवत्सुतः ॥ ७ ॥**

प्रजापाल तीर्थकराजवळ दीक्षा घेऊन त्यानेहि तशीच तपश्चर्या केली व बाराव्या सहस्रार नामक स्वर्गात देव झाला.

**द्वारावत्यामभूत्सोमप्रभभूपस्य सुप्रभः ।**

**वसुषेणचरोऽस्यासीदनुजः पुरुषोत्तमः ॥ ८ ॥**

तेथून तो द्वारावती नगरीचा राजा सोमप्रभ व राणी जयावती याच्या पोटीं सुप्रभ नांवाने जन्मला. त्याच्या सीताराणीपासून त्याला पुरुषोत्तम नामक मुलगा झाला. तो वसुषेणाचा जीव होय.

**तच्छ्रियं नारदाच्छ्रुत्वा काशीशो मधुसूदनः ।**

**तौ चण्डशासनभरौ तेनैवेभादिकंकरम् ॥ ९ ॥**

काशीनगरीचा राजा मधुसूदन याने नारदापासून पुरुषोत्तम

---

१ भवान्तरेऽलध्य शासनः कातो भूयामिति सकल्पः २ परा उत्कृष्टा स्थितिः अष्टादशसमुद्रायुः ३ जंबूद्वीपस्थे ४ शातनामा ५ सहस्रारे ६ द्वारावती च स्यात् । ७ तस्य पुरुषोत्तमस्य ८ चण्डशासनचरः ९ प्रचण्डाज्ञातत्परौ १० नारदेनैवगजरत्नादिकरं ।

व वसुप्रभ याचे वाढते सामर्थ्य ऐकले. तेव्हा त्याने हत्ती वगैरे कर-भार वसूल करण्यासाठी नारदाला पाठविले.

प्रातिलोम्यं तयोःश्रुत्वाक्रुद्धस्तौ हन्तुमागतः ।
स हतो विष्णुना सारिःक्ष्मांगतोन्त्यां बलेःशिवम्॥१०

त्याची उलट उत्तरे ऐकून तो त्याना मारण्यास गेला. तेव्हा पुरुषोत्तमाने त्याला मारले पुढे पुरुषोत्तम मरून सातव्या नरकात गेला म्हणून सुप्रभला फार दु.ख झाले. तेव्हा त्याने सोमप्रभ तीर्थंकराजवळ दीक्षा घेऊन कठिण तप केले व तो मोक्षाला गेला

**इति श्री अनन्तसुप्रभपुरुषोत्तममधुसूदनेतिवृत्तोत्तरं चतुर्दशम् ॥ १४ ॥**

---

यःसुसीमापुरे पूर्वं धातकीखण्डवत्सगे ।
नृपो दशरथःस्तावैदिन्दुग्रहणदर्शनात् ॥ १ ॥

धातकीखडाच्या पूर्वेस मेरुपर्वताजवळ विदेहक्षेत्रातील वत्सदेशात सुसीमापुरींत दशरथ नामक राजा राज्य करीत होता. त्याला चद्रग्रहण पाहून वैराग्य उत्पन्न झाले.

दीक्षितःस्तीर्थकृत्पुण्यं बध्वासर्वार्थसिद्धिशम् ।
भुक्त्वाभानुमहाराज तोऽर्को रत्नपुरेऽजनि ॥ २ ॥

दीक्षा घेऊन त्यान षोडशभावनाचे चितवन केले व तीर्थंकर नामकर्म बाधले. तेथून तो सर्वार्थसिद्धि नामक स्वर्गांत अहमिंद्र

१ गुनत्व २ सप्तमीं ३ पश्चात् ४ सुख ५ सुप्रभागर्भे ।

झाला. पुढें तो रत्नपुरचा राजा भानु व राणी सुप्रभा याच्या पोटी जन्मला.

**वीक्ष्योल्कां यानमारूढः संयमारूढकेवलः ।**
**प्रेरूढधर्मतीर्थोऽसौ धर्मो धर्मं तनोतु नः ॥ ३ ॥**

एकदा उल्कापात पाहून धर्मनाथानां वैराग्य उत्पन्न झाले व त्यानीं दीक्षा घेऊन तप आचरिले. धर्मतीर्थ प्ररूढ करून जे मोक्षाला गेले ते धर्मनाथतीर्थंकर आमचे रक्षण करोत.

**मेरोःप्रत्यगिह द्वीपे वीतशोकापुरीपतिः ।**
**नरादिवृषभस्तप्त्वा तपो दमवरान्तिके ॥ ४ ॥**

मेरु पर्वताच्या पश्चिमेस याच धातकी खंडांतील राजगृह नगरीत नरवृषभ नांवाचा राजा होता. त्यानें दमवर मुनीजवळ दीक्षा घेऊन तप आचरिले. मरणानतर तो सहस्रारनामक स्वर्गांत देव झाला.

**सहस्रार समापास्मिंस्तथा राजगृहे नृपः ।**
**सुमित्रो मल्लतादृप्तो राजसिंहेन भूभुजा ॥ ५ ॥**

त्याच राजगृहीचा राजा सुमित्र चागला मल्ल होता व त्यामुळें त्याला गर्व झाला होता. राजसिह नामक दुसरा एक मल्लराजा राजगृहीस एकदा आला.

**निर्जितो दोर्युधा कृष्णाचार्यान्ते दुर्धरं तपः ।**
**कृत्वा मृतो निदानेन माहेन्द्रेऽभून्महर्द्धिकः ॥ ६ ॥**

---

१ प्ररूढ प्रसिद्ध धर्मतीर्थं यस्य सः २ पश्चिमे. ३ मल्लयुद्धेन ४ सिंहनिःक्रीडितादिक ।

द्वंद्वयुद्धात त्यानें सुमित्राला जिंकले तेव्हा तो फार खट्टु झाला व कृष्णाचार्याजवळ जाऊन त्याने दीक्षा घेतली. सिंहनिष्क्रीडितादि घोर तपें आचरून त्यानें निदान बांधलें कीं आपण बलिष्ठ राजा व्हावे. मरणानंतर तो चौथ्या माहेंद्र नामक स्वर्गांत महर्द्धिकदेव झाला.

आद्योऽथ सिंहसेनस्य सूनुःखगपुरेशिनः ।
सीरी सुदर्शनोऽन्योऽभूद्विष्णुःपुरुषसिंहकः ॥ ७ ॥

खगपुरचा राजा सिंहसेन व राणी विजया यांच्या पोटीं नरवृषभाचा जीव स्वर्गातून सुदर्शन नावाने जन्मला. त्याच राजाला अधिकारार्णापासून सुमित्राचा जीव स्वर्गातून येऊन विष्णु नावानें झाला.

राजसिंहचरो भ्रान्त्वा ततो हास्तिनपूःपतिः ।
मधुक्रीडाभिधो जज्ञे याचमानस्ततःकरम् ॥ ८ ॥

राजसिंहमल्लाचा जीव अनेक योनींत जन्मत हस्तिनपुरचा राजा मधुक्रीड नामे करून झाला व त्याने सुदर्शन व विष्णु-पुरुषसिंह राजाकडे करभार मागितला.

केशवेन हतोऽगच्छदवधिस्थानमन्वारि ।
धर्मतीर्थकराल्लब्धबोधिःसिद्धिमगाद्बलः ॥ ९ ॥

तेव्हा त्या दोघानीं करभार नाकारल्यावर तो युद्धास आला व विष्णूकडून मारला गेला. विष्णुहि नंतर मेला व सातव्या नरकात गेला. त्यामुळें सुदर्शनाला वैराग्य वाटून त्यानें

१ नरवृषभचर. २ सुमित्रचरः ३ तदनंतर ४ दडगभार्त्स्यप्रधानमुखेन कृत्वा ५ पुरुषसिंहात् ६ पुरुषसिंहेन सह ।

धर्मनाथतीर्थकराजवळ दीक्षा घेतली व तपश्चर्येने केवलज्ञान प्राप्त करून घेऊन तो मोक्षाला गेला.

**विचित्रपुरंराणमध्यग्रैवेयकमगात्तपः ।**
**तप्त्वा नरपतिर्वासुपूज्यान्ते कोशलापतेः ॥ १० ॥**
**मघवा यः सुमित्रस्य पुत्रो भूत्वा स चक्रिताम् ॥**
**भुक्त्वापाभयघोषाख्यकेवल्यन्ते परं पदम् ॥ ११ ॥**

विचित्रपुरचा राजा नरपति नामक होता. त्याने तप आचरून मध्यम ग्रैवेयक नामक स्वर्गात अहमिंद्रपद मिळविले. तेथून तो अयोध्येचा राजा सुमित्र व राणी भद्रा याच्या पोटी मघवान नावानें जन्मला. तो चक्रवर्ती होता. बरेच वैभव भोगल्यानतर त्याला उपरति झाली व त्याने अभयघोष जिनेंद्राची वाणी ऐकून दीक्षा घेतली. बरीच तपश्चर्या करून तो मोक्षाला गेला.

**अथाच्युतादेत्य सूर्यवंशजोऽनन्तवीर्यजः ॥**
**चक्री सनत्कुमारोऽभूत्साकेतेऽत्यन्तरूपवान् ॥ १२ ॥**

अयोध्येचा सूर्यवंशी राजा अनंतवीर्य व राणी सहदेवी यांच्या पोटीं अच्युतनामक सोळाव्या स्वर्गातील देवाने सनत्कुमार नावाने जन्म घेतला. हा मुलगा रूपवान असून चक्रवर्ती होता.

**सौधर्मेन्द्रस्तुतं श्रुत्वा तद्रूप वीक्ष्य संसदि ।**
**द्वौ देवावूचतुस्तं भो चक्रिन् ! शृणु यथाश्रुतम् ॥ १३ ॥**

---

१ विचित्राख्यनगरस्य नाथो नरपतिनामा । २ सुमित्रस्य । ३ तस्य रूप ।

सौधर्मेन्द्राच्या सभेंत सनत्कुमाराच्या रूपाची स्तुति केलेली ऐकून दोन देव ते प्रत्यक्ष पाहण्यास आले व खूष होऊन ह्मणाले.

रूपं तथैव ते हेतुंर्न्यूनमद्येक्षणान्मनाक् ।
श्रुत्वेति चक्री निर्विद्य दीक्षितो वितपैश्चरन् ॥१४॥

हे चक्रवर्ति, तुझें रूप असामान्य आहे खरें पण आज आह्मी प्रथम पाहिल्या पेक्षा आता तें थोडेसे कमी झालें आहे. तें ऐकून त्याला वैराग्य उत्पन्न झाले व दीक्षा घेऊन त्यानें तपश्चर्या केली.

मासर्द्धिः प्रसहन्व्याधीन्सौधर्मेण पुनः स्तुतः ।
वेपीभूयामरः कश्चित्तं परीक्षितुमागतः ॥ १५ ॥

तपश्चर्येंत तो दुःख न मानता अनेक व्याधि सहन करू लागला ह्मणून सौधर्मेन्द्रानें त्याची पुन्हा स्तुति झाली. ती ऐकून एक देव वैद्याचा वेष घेऊन त्याची परीक्षा करण्यासाठीं आला.

भो मुने ! हन्मि ते व्याधीनित्युक्तस्तेन सोऽवदत् ॥
शरीरस्पर्शमात्रेण पश्य शाम्यन्ति मे गदाः ॥ १६ ॥

हे मुने, मी तुझी व्याधि नाहींशी करतो असे देवाने ह्मटलें तेव्हा शरीराला स्वतः स्पर्श करून मुनींनीं आपले सर्व रोग नाहींसे केले.

---

१ कारण किंवा वर्तत २ ईषत् ३ विशिष्ट ४ सक्लेशं विना सहमानः ५ वैद्यवेषं धृत्वा ६ हस्तस्पर्शेन स्वव्याधिं प्रशमय्य प्रत्यय उत्पादितः ।

हर जन्मजरादींश्चेदासि वैद्य इतीरितः[1] ।
तं स्तुत्वागात्[2] स गां[3] सोऽपि[4] हत्वा कर्माण्यकायताम्[5] १७

व ते त्यास ह्मणाले कीं तू वैद्य आहेस तर जन्मजरादिव्याधीचे निवारण कर. ते ऐकून देव स्वर्गाला परत गेला व चक्रवर्ती सर्व कर्माचा उच्छेद करून अशरीरी बनला ह्मणजे मोक्षाला गेला.

इति श्रीधर्मनाथसुदर्शनपुरुषसिंहमधुक्रीडमघवसनत्कुमारचरितं पञ्चदशम् ॥१५॥

---

श्रीषेणो मलये योऽभूद्देशे रत्नपुरे नृपः ।
इन्द्रोपेन्द्रौ[6] सुतौ सिंहनन्दितानिन्दिताख्ययोः ॥१॥

मलय देशातील रत्नपुरात श्रीषेण नामक राजा होता. त्याला सिंहनंदिता व अनिंदिता नामक दोन राण्या होत्या. पहिलीचा मुलगा इंद्रसेन व दुसरीचा उपेंद्रसेन.

पत्न्योः[7] सोऽजीजनद्विप्रस्तत्प्रियो[8] सत्यभामिका[9] ।
सपंश्चाश्चर्यमादित्यगत्यरिञ्जयचारणौ[10] ॥ २ ॥

१ कथितः २ देवः ३ स्वर्गम् ४ चक्री ५ सिद्धत्वमगात् ६ इद्रः इंद्रसेनः सिंहनंदितापुत्रःउपेन्द्रः उपेन्द्रसेनोऽनिंदितापुत्रः ७ पत्न्योर्भार्ययोर्विप्रे सुतौ अजीजनत् । ८ कपिलः । ९ मगधदेशाचलग्रामवास्तव्याविप्रधरणीजटसत्कदासीपुत्रस्य कपिलाख्यस्य पत्नी १० राजा ११ रत्नवृष्टिः, पुष्पवृष्टिः, सुरदुदाभिनिःस्वनः, सुवातः, साधुवादश्चेति दानस्याश्चर्यपंचक पचारचर्यसाहित ।

मगधदेशातील अचलगावचा ब्राह्मण धरणीजट व ब्राह्मणी अग्निला याच्या पोटीं इन्द्रभूति व अग्निभूति नामक दोन पुत्र जन्मले. त्या ब्राम्हणाचा कपिल नामक एक दासीपुत्र होता. रत्नपुरच्या सत्यक ब्राह्मणानें जबू ब्राह्मणीपासून झालेली सत्यभामा कपिलाला दिली. तो श्रीषेण राजाच्या दरबारी काहीं दिवस होता. पण त्याचें हीनकुल कळल्यावर त्याला हाकलून देण्यांत आले. रत्नपुरात एकदा आदित्यगति व अरिंजय नामक चारणमुनि आले. त्याना राजानें आहार दान केल्यामुळे पाच आश्चर्याची वृष्टि झाली. ( रत्नवृष्टि, पुष्पवृष्टि, सुरदुदुभीनिनाद, सुगधीवारा, व जयजयकार हीं पाच आश्चर्यें होत )

सन्तर्प्याग्निन सोऽवध्नात्पुण्यं तांश्चानुमोद्य तत्[३] ।
पुत्रावनन्तमतियुद्धग्नाज्ञावन्नु सोऽन्यदा ॥ ३ ॥

मुनीला आहारदान केल्यामुळें श्रीषेण राजाला व त्याला अनुमोदन दिल्यामुळे सिंहनदिता, आनदिता व सत्यभामा या तीघीना उत्तर कुरूभोगभूमींतील आयुष्याचें बधन झाले. कौशाबीनगरीचा राजा महाबल व राणी श्रीमती याची मुलगी श्रीकाता इन्द्रसेनाला दिली होती. तिच्याबरोबर अनतमती नावाची दासी पाठराखीण आली होती. तिच्याशीं उपेन्द्रसेनाचा सबध घडला.

१ राजा २ तिस्रः अबध्नन् ३ दीयमान दान ४ इन्द्रसेनपत्न्याः श्रीकातायाः विलासिन्यै अनतमतिनाम्न्यै युधि भग्ना आज्ञा यकाभ्या तौ निमित्तकृत्य.

**रंतुं गतो वने घ्रात्वा विषपुष्पं मृतःसमम् ।**
**ताभिश्च धातकीखण्डप्राङ्मेरूदक्कुरावभूत् ॥ ४ ॥**

त्यामुळे इंद्रसेन चिडला व दोघांचें युद्ध जुंपलें. त्याना आवरण्यासाठी राजा दोन राण्या व सत्यभामेसह गेला असता त्यांनी एक विषारी फूल हुंगले व ते चौघे तेथे मेले. धातकीखंडात मेरूपर्वताजवळ उत्तरकुरु नामक भोगभूमीत राजा व सिंहनंदिता आणि अनिंदिता व सत्यभामा या चार जीवांची दोन आर्य जोडपीं जन्मली.

**सिंहनन्दितया भोगान्भुक्त्वा तत्रार्ययार्थं सः ।**
**सौधर्मेऽभूत्सत्यभामापत्नीकोऽनिन्दितौचरः ॥ ५ ॥**

त्या उत्तरकुरुभोगभूमीत सिंहनंदितेसह बराच काळपर्यंत भोग भोगून श्रीषेण सौधर्मस्वर्गांत देव झाला. अनिंदितेचा जीव आर्य व सत्यभामेचा जीव आर्या झाला होता. हे जोडपेहि सौधर्म स्वर्गांत गेले.

**आर्योऽपि तौ मिथःप्रीतौ श्रीषेणार्यचरोऽमरः ।**
**अत्रामितादितेजस्को द्विश्रेणीट्तत्प्रियाप्यभूत् ॥ ६ ॥**

---

१ उदक्कुरौ २ पत्नीभूतया ३ अनिंदिताराज्ञी तत्रार्योऽभूत् सत्यभामा च तस्य पत्नी । ४ श्रीषेणश्चार्यचरो देवः श्रीप्रभनामा श्रीनिलये विमाने जातः । श्रीषेणपत्नी च विद्युत्प्रभाख्या सिंहनदितार्याचरी । तथा अनिंदितार्यचरो देवः विमलप्रभाख्ये विमाने जातः । तत्पत्नी च शुक्लप्रभाख्या सत्यभामार्याचरी सिंहनदिताचरी ज्योतिःप्रभा जाता । सत्यभामाचरी सुतारा जाता । ५ अस्मिन् भरतक्षेत्रे विजयार्द्धदाक्षिणश्रेण्या रथनूपुरचक्रवालपुरे ६ ज्योतिःप्रभा ।

हीं आर्य जोडपीं परस्परावर फार प्रेम करीत. श्रीषेणाचा जीव श्रीनिलयविमानात श्रीप्रभनामक देव झाला व सिंहनदिता विद्युत्प्रभानामक देवी झाली. अनिंदितेचा जीव विमलप्रभानामक विमानात देव झाला व सत्यभामेचा जीव सुतारादेवी झाली. चक्रवालरथनूपुरचा राजा ज्वलनजटी विद्याधर व राणी वायुवेगा याना स्वयप्रभानामक पुत्री झाली. सुरम्यदेशातलि पोदनपुरचा राजा प्रजापति व राणी मृगावती याच्या उदरीं त्रिपृष्ट जन्मला. याला स्वयप्रभा दिली.

त्रिपृष्टविष्णुमंत्रस्य स्वयम्प्रभावृतत्सुखम् ।
सुतारा तत्स्वसा ज्यालीभूतं श्रीविजयार्न्हयम् ॥ ७ ॥

पोदनपुरच्या प्रजापती राजास भद्राराणी पासून विजय जन्मला. त्रिपृष्ट विष्णूला स्वयप्रभेपासून ज्योतिप्रभा नामक मुलगी झाली व विजनभद्र आणि श्रीविजयनामक दोन मुलगे झाले. स्वयप्रभेला अर्ककीर्तिनामक भाऊ होता. त्याची पत्नी ज्योतिर्माला. त्याना अमिततेज नामक पुत्र व सुतारानामक पुत्री झाली. ज्योतिःप्रभा अमिततेजाला देण्यात आली व सुतारा श्रीविजयाला देण्यात आली.

तां हृतां प्राग्भवप्रेम्णाऽशनिघोषखगेशिना ।
प्रत्यानीयार्हदाद्दीक्षसंयमं विजयार्हत ॥ ८ ॥

१ अन्तभूमौ पित्रा सहागत्य २ सुख यथा भवति ३ अमिततेजसो भगिनी ४ विमलप्रभचर ५ सुतारा ६ संग्राम विधाय ७ गृहीत्वा ।

चमरचचापुरचा राजा इंद्राशनि व राणी आसुरिका यांच्या पोटी अशनिघोषनामक विद्याधर पुत्र जन्मला. त्याने सुतारेला पाहताच तो मोहित होऊन तिला पळवून नेली. एक मायामृग निर्माण करून त्याच्या मागे त्याने श्रीविजयला लावले होते. वेतालनिामक विद्येला सुतारेचे खोटे रूप देऊन बसविले होते. श्रीविजय शिकारीहून परत आल्याबरोबर साप चावल्याचे ढोंग करून वैताली मरून पडली. सुताराच मेली असे मानून श्रीविजय शोक करीत होता इतक्यात एका विद्याधराने अशनिघोषाशी लढून तिला आणून पोहोचविली. विजय अरिहंताजवळ अशनिघोषाने दीक्षा घेतली. अमिततेज श्रीविजयाच्या मदतीस आला.त्यानेहि देशसंयम स्वीकारला.

> सं गृहीत्वा चिरं तप्त्वा मासायुःप्रार्थतो मृतः ।
> कृत्वाष्टाहमहं सख्यामानतेऽभून्निदानिनौ ॥ ९ ॥

देशसंयम घेऊन त्यांनी अष्टान्हिक पूजा केली. एकमहिना आयुष्य उरले असता त्याने नंदनमुनींजवळ दीक्षा घेतली व अमिततेज तेराव्या आनत स्वर्गात नंद्यावर्त विमानात मणिचूल नामक देव झाला. आणि श्रीविजयाहि त्याच स्वर्गात स्वस्तिक विमानात मणिचूलनामक देव झाला.

> ततोऽत्र वत्सकावत्यां प्रभाकर्यां बलाच्युतौ ।
> स्त स्मापराजितानन्तवीर्यौ स्तामितसागरौ ॥ १० ॥

१ अमिततेजाः २ नंदनात् ३ अष्टान्हिक कृत्वा द्वाविंशतिदिन सन्यासेन ४ श्रीविजयेन सह ५ अमरगुरुमुनिनो विश्वनदिभगीदत्तः त्रिपृष्टस्य भुत्वा कृतविपुलक्ष्मीनिदानन ६ स्तिमितसागरनृपपुत्रौ

जम्बुद्वीपात पूर्वविदेहक्षेत्रात वत्सकावती देशातील प्रभाकरी नगरींत राजा स्तिमितसागर व राणी वसुधरा याच्या पोटीं रविचूलदेव अपराजित नामें करून जन्मला व त्याच राजाच्या वसुमती राणीस मणिचूलदेव अनतवीर्य नावाने जन्मला.

सिद्धविद्यौ नर्तकीप्सुं दमितार्यर्द्धचक्रिणम् ।
हत्वा तत्र हरिर्भुक्त्वा महीं घांर्मोऽहसोऽजनि ॥११॥

हे दोघे भाऊ परस्परावर प्रेम करीत राज्य करीत. वर्बरी व चिलातिका या दोन नर्तिकाचे नृत्य त्याना फार आवडे. शिवमदिर नगराचा राजा दमितारि याला त्या नर्तकीचा मोह पडला. त्याने त्या मागविल्या. पण वरील दोघा भावानीं त्याना पाठविले नाहीं व स्वतःच विद्यादेवीच्या साहाय्याने त्या नर्तकींचा वेष घेऊन गेले व राजाला सतुष्ट केलें. या वेषधारी दोन नर्तकी जवळ राजकन्या कनकश्रीला नर्तन शिकण्यास ठेवलें. तेव्हा हे दोघे भाऊ तिला पळवून घेऊन गेले. दमितारीला सर्व प्रकार कळल्यावर तो प्रभा-करी नगरीवर चाल करून गेला. अपराजित व दमितारीची लढाई जुपली. अनतवीर्यानें त्याला ठार मारले. अनतवीर्यनारायण मरून रत्नप्रभा नामक पहिल्या नरकात गेला.

रामोऽच्युतेन्द्रस्तपसा ततोऽहीन्द्रभुवा दृशा ।
खगेट्भूतं तपः प्राप्यं तं निन्ये स मतीन्द्रताम् ॥१२॥

१ पापेन धर्मायां जातः २ अजनि ३ उत्पन्नेन सम्यक्त्वेन ४ अनत वीर्यचर ५ अच्युतेंद्रः ।

त्यामुळे अपराजित बलदेवास फार दुःख झाले. त्याने यशोधर मुनीजवळ दीक्षा घेतली. अवधिज्ञान उत्पन्न झाल्यावर एक महिनाभर अनशनव्रत आचरून तो अच्युतस्वर्गात इंद्र झाला. स्तिमितसागर मेल्यावर धरणेंद्र झाला होता. त्याने अनंतवीर्याच्या जीवास बोध केल्यावर पहिल्या नरकातून निघून तो मेघनाद विद्याधर झाला. पुढे मुनि बनून मेल्यानतर अच्युतस्वर्गात प्रतींद्र झाला.

**च्युत्वेन्द्रो मङ्गलावत्यां चक्री वज्रायुधोऽभवत्।**
**युवराजोऽन्यःसहस्रायुधःक्षेमङ्करीपतेः ॥ १३ ॥**

अपराजिताचा जीव स्वर्गातून याच द्वीपांत मंगलावती देशातील रत्नसंचयपुरचा राजा क्षेमंकर व राणी कनकचित्रा यांच्या पोटीं वज्रायुध नांवाने जन्मला. अनतवीर्याचा जीवहि स्वर्गातून येऊन त्याच राजाला लक्ष्मीमती राणी पासून सहस्रायुधनामे करून झाला.

**शुद्धदृक्सोऽवधिश्चक्री तपसापाहमिन्द्रताम्[३] ।**
**सानुजःपुष्कलावत्यामथासौ पुण्डरीकिणीट् ॥ १४ ॥**

सम्यग्दर्शन प्राप्त करून घेऊन वज्रायुधाने क्षेमकर अरिहंता-

१ प्रतीन्द्रः २ ईशानेद्रस्तुत दर्शनविशुद्धिस्तच्छ्रवणादायातेन कृतवादेन विचित्रभूतदेवेन पूजितस्तथा विद्युद्दंष्ट्रचरखेटकृतोपसर्गं भुक्त्वा प्राप्तचक्रश्रीश्च अनुगाम्यवधियुक्तः । ३ उपरिमग्रैवेयकाधोविमाने सौमनसाख्ये ।

जवळ जाऊन भावामुलासह दीक्षा घेतली व ते दोघे ऊर्ध्वग्रैवेयक स्वर्गातील सौमनस नामक विमानात अहमिंद्र झाले. पुष्कलावती देशातील पुंडरीकिणी नगरींत राजा घनरथ व राणी मनोहरा याच्या पोटीं वज्रायुध अहमिंद्र मेघरथ नामे करून जन्मला.

> जज्ञे घानरथिर्मेघरथो दृढरथोऽपरः ।
> प्रबोध्य कुक्कुटौ गृध्रकपोतौ चाप्य वन्यताम् ॥१५॥

अहमिंद्र सहस्रायुधहि राजा घनरथालाच मनोरमा राणी-पासून दृढरथ नामेकरून झाला. दोन कोंबड्याची झुंज दोन दासींनी लावली व कोंबडे मेले त्याची भवावली मेघरथाने अग्नी सांगितली. हे दोन कोंबडे भद्र व धन्य नामक सख्खे भाऊ होते. आपापसात लढून मेल्यावर श्वेतवर्ण व नामकर्ण नामक हत्ती झाले. तेथ परस्पर लढून मेल्यावर ते जीव अयोध्येच्या गवळ्याचे घरीं रेडे झाले. तेथे झुंज खेळून मेल्यावर दोन मेंढे झाले व टक्कर घेऊन मेले आणि या नगरात कोंबडे झाले मेघरथाच्या आश्रयास एकदा एक कबूतर आले व पाठोपाठ गृध्रपक्षीहि आला व आपण क्षुत्पीडित असल्यामुळे कबूतर खाण्यास द्या म्हणाला. तेव्हा त्या दोघांची भवावली त्याने सांगितली. पूर्वभवात हे दोघे धनमित्र व नंदिषेण नामक वाणी होते व लढून मेले आणि गृध्रकपोत झाले. गृध्रकपोत मेल्यावर अनुक्रमे सुरूप व अतिरूप नामक व्यंतर देव झाले

१ घनरथस्य तीर्थंकरपुत्र २ द्वितीय ।

**दत्तीज्याव्रतशीलाप्तपुण्यार्द्दीक्षितस्तपःश्रितः ।**
**पितुस्तीर्थकृतो बद्धतीर्थकृत्त्वःसहानुजः ॥ १६ ॥**

मुनीना आहारदान, उपवास, तीर्थकरपूजन वगैरे व्रते आचरून मेघरथाने घनरथाजवळ दीक्षा घेतली. एकादशागाचे अध्ययन करून त्याने तीर्थकरनामकर्म बाधले. दृढरथानेहि दीक्षा घेतली.

**सर्वार्थसिद्धौ प्राप्तः शं भुक्त्वास्मिन् विश्वसेनतुंक् ।**
**कामः शान्तिरभूच्चक्री तीर्थकृच्चानुजानुजः ॥ १७ ॥**

कुरुजागलदेशांतील हस्तिनापुरात राजा अजितसेन व राणी प्रियदर्शना याच्या पोटी जन्मलेला विश्वसेन नामे करून राजा राज्य करीत होता. गधारदेशांत गंधार नगरचा राजा अजितजय व राणी अजिता यांची मुलगी ऐरा विश्वसेनास देण्यात आली. त्यांच्या पोटीं मेघरथ स्वर्गांतून येऊन शातिनाथ तीर्थकर जन्मले. दृढरथ चक्रायुद्ध होऊन जन्मला.

**चक्रायुधो गणेशश्च जात्वीशः स्वं विभूषयन् ।**
**दृष्ट्वादर्शे निजच्छायाद्वयमुद्भूतबोधिकः ॥ १८ ॥**

अनिंदिताराणी, विमलप्रभदव, श्रीविजय, देव, अनतवीर्य नारायण, नारकी, मेघनाद, प्रतींद्र, सहस्रायुध, अहमिंद्र दृढरथ, अहमिंद्र इतक्या भवांतून आलेल्या तो दृढरथाचा जीव चक्रायुध

१ पुण्येन ऋद्धिः राजर्षिर्जातः २ पुत्रः ऐरागर्भे ३ पूर्वमनुजः इदानीमपि अनुजस्चक्रायुधः ४ भाविनि भूतवदुपचारः ।

झाला. व शांतिनाथ तीर्थकराचा गणधर झाला. अनेक वर्षे राज्य वैभव भोगल्यानंतर शांतिनाथांना आरशांत आपली दोन प्रतिबिंबें पाहून वैराग्य प्राप्त झालें.

संयम्य जीवन्मुक्तोऽभूत्तो भव्यान्भववारिधेः ।
उद्धृत्य निर्वृतिं प्राप्तौ दिश्यास्तां नः शिवश्रियम् १९

दीक्षा घेऊन त्यांनीं तपश्चर्या केली व केवली बनून भव्य जनांना संसारसागरांतून तारले आणि त्यांनीं निर्वाणपद मिळविलें ते शांतिनाथ तीर्थंकर व चक्रायुध गणधर आम्हाला मोक्षलक्ष्मी देवोत.

श्रीषेणो भोगभूम्यार्यः सौधर्मे श्रीप्रभामरः ॥
खगेन्द्रोऽमिततेजस्क आनते त्रिदशो बलः ॥ २० ॥
योऽच्युतेन्द्रोऽभवच्चक्री बुधो ग्रैवेयकामरः ॥
नृपो मेघरथोन्त्योहमिंद्रः शांतिः स पातु नः ॥ २१ ॥

श्रीषेण, उत्तरकुरु भोगभूमींतील आर्य, सौधर्म स्वर्गांतील श्रीप्रभदेव, विद्याधर, आनतस्वर्गांत देव, बलभद्र अच्युतेन्द्र, वज्रायुध, अहमिंद्र मेघरथराजा व अहमिंद्र इतकी भवावली भोगून आलेला जीव शांतिनाथ नामक तीर्थंकर झाला. तो आमचे रक्षण करो.

॥ इति श्रीशान्तिनाथपुराणं षोडशम् ॥ १६ ॥

---

सुसीमेद्र प्राग्विदेहे धिवत्सांसिंहरथोऽराज. ।
दिवोल्कापातमालोक्य दीक्षितो वृषभाद्गुरोः ॥ १ ॥

जंबूद्वीपांत पूर्वविदेह क्षेत्रांत वत्स देशांतील सुसीमा

१ तीर्थकृद्गणधरौ २ अपराजितः ३ दिवसं

नगरींत राजा सिंहरथ राज्य करीत होता. एकदा दिवसा झालेला उल्कापात पाहून त्याला वैराग्य प्राप्त झाले व वृषभमुनींच्या जवळ दीक्षा घेऊन त्यानें तप आचरिले. षोडश भावनांचे चिंतन करून त्याने तीर्थंकरनामकर्म बांधले.

**बद्धतीर्थकरत्वोऽगादन्त्यीं दिवमतःसुतः ।**
**यो भूत्वा सूरसेनस्य कुरुराजस्य हस्तिने ॥२॥**

शेवटीं समाधिमरण साधून तो सर्वार्थसिद्धि विमानांत अहमिंद्र झाला. तेथून कुरुजांगल देशांतील हस्तिनापुरचा राजा सूरसेन व राणी श्रीकाता याच्या पोटीं तो कुंथुनाथ नामेकरून जन्मला.

**प्राप्य चक्रिश्रियं जातु रन्त्वागच्छन्वनान्मुनिम् ।**
**दृष्ट्वा तपःस्थं भुक्त्वेन्द्रचक्रित्वे एष मोक्ष्यते॥ ३ ॥**

त्याला चक्रवर्तित्व प्राप्त झाले. एकदा तो मंत्र्यासह वनक्रीडा करून येत असता त्याने एक तपस्वी पाहिला. असे तप केलें असतां चक्रवर्तीचे वैभव प्राप्त होते व मोक्षहि मिळतो असे कुंथुनाथाने सांगितलें.

**इत्येवं मन्त्रिणा पृष्टो दृष्टपूर्वभवस्तपः ।**
**कृत्वार्हन्त्यं गतश्चक्रे तीर्थं कन्थुं नमामि तम् ॥ ४ ॥**

मंत्र्याने विचारलेल्या प्रश्नास वरील उत्तर देऊन कुंथुनाथांनां पूर्वभवांतून केलेल्या तपश्चर्येचें स्मरण झाले. नंतर दीक्षा घेऊन त्यानीं

---

१ सर्वार्थसिद्धिं २ श्रीकातागर्भे ३ कंचिदातपयोगस्थ ४ चेत्कदाचिदस्मिन्भवे न मोक्ष्यते तर्हि इंद्रचक्रित्वे भुक्त्वा मोक्षं यास्यति ।

तप आचरून केवलज्ञान मिळविले व धर्मतीर्थ सुरू करून मोक्षाला गेले त्या कुंथुनाथाना मी नमस्कार करतो.

इति श्रीकुन्थुनाथस्य सप्तदशम् ॥ १७ ॥

---

कच्छाक्षेमपुरे तद्वंद्योऽभूद्धनपतिर्नृपः ।
नन्दतीर्थकरात्प्राप्तसंयमोजिंततीर्थकृत् ॥ १ ॥

कच्छ देशातील क्षेमपुरात धनपतिनामक राजा राज्य करीत होता. त्याने नदतीर्थकराची बोधवाणी ऐकून दीक्षा घेतली व तपश्चरण करून तीर्थकर नामकर्म बाधलें.

गत्वा जयन्तमागत्य हस्तिनेशात्सुदर्शनात् ।
प्राप्तजन्मात्तचक्रश्रीः शरन्मेघक्षयेक्षणात् ॥ २ ॥

तेथून तो जयत नामक विमानात अहमिंद्र झाला व पुढे हस्तिनापुरचा राजा सुदर्शन व राणी मित्रसेना याच्या पोटीं जन्मला. अरनाथाना चक्रवर्तीपद प्राप्त झाले. बरींच वर्षे ऐश्वर्य भोगल्यावर त्याना शरदृतूतील ढग एकदम विलयाला गेलेले पाहून वैराग्य उत्पन्न झाले.

आदाय संयमं लब्ध्वा केवलं धर्मदेशनात् ।
विश्वमुद्धृत्य यःसिद्धः स्मरामि तमरं प्रभुम् ॥ ३ ॥

दीक्षा घेतल्यावर त्याना केवलज्ञान प्राप्त झालें. धर्मतीर्थ प्रव-

१ जम्बूद्वीपप्र ग्विदेहे २ ऊर्जित पाठ ऊर्जितमुपार्जि। ३ मित्रसेनागर्भे ४ चक्रश्रीर्यस्य स प्राप्तजन्मा ।

र्तित करून त्यांनीं भव्यजीवांचा उद्धार केला व मोक्षपद मिळविलें त्या अरनाथांचे मी स्मरण करतो.

भूपालाख्यो नृपोऽत्रासीज्जितो युद्धेऽरिभिस्तपः ।
सम्भूतान्ते स कृत्वागान्महाशुक्रं निदानवान् ॥४॥

याच भरतक्षेत्रांत भूपाळ नामक राजा होता. एका युद्धांत त्याचा पराजय झाल्यामुळे खिन्न होऊन त्यानें संभूतमुनीजवळ दीक्षा घेतली व खूब तपश्चर्या करून त्यानें निदान केलें कीं आपणाला चक्रवर्तिपद प्राप्त व्हावें. समाधिमरण साधल्यानंतर तो महाशुक्र नामक दहाव्या स्वर्गांत देव झाला.

सहस्रबाहुरिक्ष्वाकुः साकेते ऽजनि तत्प्रिया ।
जाता चित्रमतिः कन्याकुब्जराट्पारतात्मजा ॥५॥

कौशल देशातील अयोध्यानगरींत इक्ष्वाकु वंशाचा सहस्रबाहु राजा राज्य करीत होता. त्याच्या राणीचे नाव चित्रमति. ती कुब्ज देशाच्या पारत नामक राजाची मुलगी होती.

तत्पुत्रः कृतवीरश्च तापसस्तत्पितृव्यजः ।
जमदग्निर्दृढग्राहिहारिशर्मचरामरौ ॥ ६ ॥

त्याना कृतवीर नामक पुत्र झाला. राजा सहस्रबाहूचे काका शतबिंदु यांना पारत राजाची बहिण श्रीमती दिली होती.

१ एकीभूतबहुशत्रुभिः २ भूयान्मे चक्रित्वमिति ३ पारतनृपस्य पुत्री चित्रमति ४ सहस्रबाहुनृपस्य ५ सहस्रबाहोः पितृव्यः शतबिंदुस्तस्य भार्या श्रीमती सा पारतस्य भगिनी तस्याः श्रीमत्याः पुत्रो जमदग्निः

त्याना जमदग्नि नावाचा पुत्र झाला. बालपणींच त्याची आई मेल्यावर त्यानें दीक्षा घेतली व तपश्चरण केलें. दृढग्राही राजा व हरिशर्मा या नावाचा ब्राम्हण हे दोघे मित्र होते.

अपुत्रस्य गतिर्नास्तीत्यश्रौष्वा कीचकाकृती ।
परिणायितवन्तो तं रेणुकीं पारताङ्गजाम् ॥७॥

दृढग्राहीने जिनदीक्षा घेतली. हरिशर्मा तपस्वी होऊन मेल्यानतर ज्योतिषी देव झाला. तपस्व्याचे तप अशुद्ध असते व जैन मुनींचेच तप खरें ही गोष्ट जोतिषदेवाला दाखवून देण्यासाठीं सौधर्मदेवाने दोघानाही चिमणीचे रूप देऊन जमदग्नीच्या दाढीमिशात जाऊन वास्तव्य केले. निपुत्रिकाला शुभगति नाहीं असे त्या चिमण्या आपसात बोलू लागल्या. तें ऐकून जमदग्नि तपश्चर्या सोडून कन्याकुब्ज देशाच्या राजाकडे गेला. तो राजा त्याचा मामा होता. त्याला आपली लग्न करण्याची इच्छा जमदग्नीने सांगितली. पण कान्यकुब्ज देशाच्या राजानें त्याचा धिःकार केला तरी पण आपली मुलगी रेणुका त्याला दिली. हा प्रकार पाहून चिमणीरूपी ज्योतिषदेवाची खात्री झाली कीं तपस्व्याचें तप अशुद्ध असते.

सा कामधेनुपरशू स्वाग्रजारिंजयान्मुनेः ।
सत्कृता गुरुता लेभे ज्ञात्वा यातं स्वमाश्रमम् ॥ ८ ॥

१ द्वौ जमदग्निं परिणायितवन्तौ २ पुराणेषु ३ आमर्यादाया पक्षिविशेषमिथुनभूतौ ४ चित्रमतिभगिनी । ५ द्वे वित्ते लेभे. ६ आगतं ।

रेणुकेचा भाऊ अरिंजयमुनि एकदा तिला भेटावयास आला असतां तिने त्याच्यापासून सम्यग्दर्शनासह अणुव्रते प्राप्त करून घेतलीं. जाताना त्यानें कामधेनु व परशु भेट देऊन तो स्वस्थानीं परत गेला.

राजा¹ सनाभिःसपुतो भोजितो जमदग्निना ।
तं हत्वा कामधेनुं तां लात्वायातः² फलादिकम्³ ॥९॥

एकदा सहस्रबाहुराजा आपले भाऊबद व कृतवीर नामक मुलासह जमदग्नीच्या आश्रमास आला असता राजावाड्यातहि दुर्मि-ळ असें त्यांचे आदरातिथ्य करण्यात आले. कामधेनूमुळें तो तें करूं शकला. राजाने ती कामधेनू मागितली. जमदग्नी देईना म्हणून त्याला ठार मारून ती घेऊन गेला.

आहृत्याय³ानिन्द्रराम⁴:सानुजस्तत्सुतं क्रुधा ।
हत्वा त्रिःसप्तकृत्वान्यान्क्षत्रियांश्चाभुनग्भुवम्⁵ ॥१०॥

जमदग्नीला इंद्रराम व श्वेतराम असे दोन पुत्र होते. ते फळें गोळा करण्यास गेले होते. परत आल्यावर ते दृश्य पाहून ते रागा-वले. ते दोघे अयोध्येत जाऊन सहस्रबाहु व कृतवीराशी लढले आणि सहस्रबाहूस ठार मारून कामधेनु परत घेऊन आले. नंतर त्यानी रागाने एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली व स्वतः पृथ्वीचें राज्य भोगलें

---

१ सहस्रबाहुः २ गतः ३ आहृत्य गृहीत्वा ४ जमदग्निपुत्रः ५ पालयामास ।

हृत्वा तद्विधुरे चित्रमतिं प्राग्देवगर्भिणीम् ।
शाण्डिल्यस्तापसोऽन्यस्य सुबन्धुमुनिसन्निधौ ॥११॥

भूपाळ राजाचा जीव महाशुक्र नामक दहाव्या स्वर्गात होता. तो महस्रबाहूची राणी चित्रमती इच्या पोटात होता. चित्रमतीचा भाऊ शाडिल्य नामक तपस्याला ही गोष्ट कळताच त्याने तिला सुबंधु मुनीजवळ नेऊन ठेविली.

तदग्रजः सारयितुं जगाम स्वमठी तदा ।
वनदेवीभिरीशत्वात्राँतं सुतमसूत सा ॥ १२ ॥

आपल्या मठाचे रक्षण करण्यासाठीं शाडिल्य परत निघून गेला. इकडे चित्रमति बाळंतीण झाली व वनदेवतानीं तो पुत्र चक्रवर्ती होणार असल्यामुळे त्याचे रक्षण केले.

षोडशेऽब्दे ह्ययं भावी चक्रीह प्रत्ययं शृणु ।
साग्निचुल्लीगतस्थूलकिलींसघृतमध्यगान् ॥१३॥
उष्णानपूपानादाय भक्षयिष्यत्ययं शिशुः ।
इति सोऽसान्त्वयेत्पृष्टो निर्ग्रन्थस्तां सुदुःखिताम् १४

सुबंधुमुनींना तिने मुलाचें भविष्य विचारलें असता ते म्हणाले कीं सोळाव्ये वर्षी हा चक्रवर्ती होणार आहे.त्याचे लक्षण हें

१ गृहीत्वा २ सहस्त्रबाहुमरणदुःखे ३ भूपालचरमहाशुक्रामरेण गर्भे-स्थेन. ४ संस्थाप्य । ५ चित्रमतिज्येष्ठभ्राता शाडिल्यः ६ स्वमठगभालकरणार्थे ७ रक्षित ८ आस्मिन्भारते ९ विश्वासवचन १० कटाह ११ सुबंधुगुरुः १२ सान्त्वनमनयत् ।

की, जळत्या चुलीवरील उकळतें तूप असलेल्या कढईतून हातानें पुऱ्या काढून घेऊन तो तशाच कढत कढत खाईल. म्हणून निश्चित रहा. असें सांगून निर्ग्रंथ मुनीनें त्या दुःखित मातेचें सांत्वन केलें.

ततःप्रत्येत्यं शाण्डिल्यस्तां नीत्वा ससुतां मठीम् ।
सुभौमनाम्ना शस्त्रैस्तत्प्रयोगैश्चायुजत्सुतम् १५ ॥

नंतर शांडिल्यानें परत येऊन मुलासह आपल्या वहिणीला मठांत नेलें. त्याचे नाव सुभौम ठेऊन शस्त्राचे सप्रयोग शिक्षण त्याला देण्यास सुरवात केली.

रामो यस्याश्नतोऽन्नास्युंःक्षत्रदन्तांःस ते रिपुः ।
जातो यतस्त्वेप्सुहितो निमित्तज्ञेन निर्ययो ॥ १६ ॥

इकडे परशुरामाला निमित्तज्ञानें सांगितलें की, तुम्ही मारलेल्या राजाचे दांत ज्याच्या प्रभावानें जेवीत असतांना भातासारखे होतील तो तुमचा शत्रु समजा. तेव्हा आपलें हित इच्छिणाऱ्या परशुरामानें भोजनशाळा घातली.

सत्रं वह्निरयोध्यायास्तं परिव्राजकाकृतिम् ।
तन्नाश्नन्तं से निश्चित्य तथैवोच्छेत्तुमुद्यतः ॥ १७ ॥

१ पश्चादागत्य २ शोभना मुनिपादपवित्रा भूमिमाश्लिष्य जात इति सुभू मौ भवः । ३ भोजनं कुर्वतः यस्य पुंसः ४ कलमान्न भवेयुः ५ त्वन्निहतक्षत्रियदंताः ६ आत्मनो हितवाञ्छकः ७ निमित्तकुशलाख्येन रामो भणितः ८ सत्र अन्नदानशाला निष्पादयामास ९ त्रिदाडियतिवे प्रधारिणं १० स चासौ न अश्नन् तं तन्नाश्नंत ११ रामः १२ मारयितुं ।

अयोध्यानगरीच्या बाहेर त्याने घातलेल्या भोजनशाळेत एकदा परिव्राजकाच्या वेषात असलेला सुभौम आला व त्याने भात झालेले ते दात खाल्ले नाहींत परशुरामाला हे वृत्त कळल्याबरोबर तो त्याला ठार मारण्यास उद्युक्त झाला.

तत्कालसिद्धचक्रेण हतस्तेनेभवर्तिना ।
तपसा क्रीतचक्रिश्रीरसास्वादनलम्पट ॥ १८ ॥

तत्काल तेथे गजवारण हत्ती आला व चक्राहि निर्माण झालें त्या हत्तीवर वसून सुभौमाने त्या तपश्चर्येने प्राप्त करून घेतलेल्या चक्रवर्ती पदाचे वैभव भोगण्यास चटावलेल्या परशुरामासह चक्राने लटण्यास सुरवात केली व त्याला ठार मारलें.

स सूपकारमन्येद्युर्दत्तवन्तं मुदाम्लिकाम् ।
रसायनाव्हां तद्वैरिकोपितोऽघातयत्कुधीः ॥ १९ ॥

पुढें एकदा अमृतरसायन नामक आचाऱ्याने रसायन नावाची अम्लिका ( एक भोज्य पदार्थ ) सुभौमाला खाण्यास दिली असता स्वयंपाक्याच्या शत्रूंनी चिथविल्यामुळे रागाचे भरात त्यानें त्यास ठार केलें

इमं वध्यासमित्यात्तशल्योऽसौ पुण्यलेशतः ।
ज्योतिर्लोकेऽमरो वैरात्कुज्ञानी ज्योतिषोऽजनि॥२०॥

याला मी ठार मारीन असें निदान करून तो आचारी मेला व थोडे पुण्य बाकी असल्यामुळें ज्योतिर्लोकांत ज्योतिष देव झाला.

१ म चार्षीमाल्लत्काल. २ गधगजारूढेन ३ नाम्नी ४ सूपकारशत्रु

**दिव्यैःफलैःप्रवेश्याब्धिं पोतेनामारयत्स्वयं ।**
**प्राग्जन्माकृतिमादर्श्य वैरं चोक्त्वाक्षिपन्मुनेः॥२१॥**

ज्योतिषदेव वैश्यरूपानें काही दिवस दिव्य फळे पुढे सुभौमाला आणून देऊ लागला. राजाला त्याची चटक लागली पण आता तीं मिळणे शक्य नाहीं तरी तुह्मी मजबरोबर वनात चला ह्मणजे अधिक मिळतील. राजा फलाच्या आशेने त्याचेवर विश्वास ठेवून निघाला. जहाजांतून जात असता आपलें पूर्वीचे आचाऱ्याचे रूप देवाने दाखवून सुभौमाला ठार मारले.

**सुतौ रामौ जामदग्नी रौद्रध्यानादधोऽगमत् ।**
**सहस्त्रबाहुस्तत्पुत्रो लोभात्तिर्यग्गतिं गतौ ॥ २२ ॥**

याप्रमाणें जमदग्नि मुनीचे मुलगे इंद्रराम व परशुराम रौद्रध्यानानें नरकांत पडले व सहस्त्रबाहु आपल्या पुत्रासह लोभकषायामुळें तिर्यंच गतींत जन्मले.

**राजपुत्रस्तपोऽत्रैकैश्चकाराशयैशल्यवान् ।**
**सुकेतोः प्राप्य सौधर्मं च्युतौ चक्रपुरेशिनः ॥ २३ ॥**

सुकेतु राजाच्या आश्रयाने पुंडलीकाचा जीव निदानपूर्वक तप आचरून सौधर्म नामक पाहिल्या स्वर्गांत देव झाला व तेथून तो भरतक्षेत्रांत चक्रपुरच्या इक्ष्वाकुवंशाचा राजा वरसेन व राणी लक्ष्मीमती यांच्या पोटीं पुंडलीक नांवानें जन्मला.

---

१ परुषवचोभिस्तिरस्कुर्वन् २ जमदग्नेः पुत्रः ३ कृतवीरः ४ जंबूद्वीपभरते ५ चित्ते शल्यवान् ६ मित्रवर्मसुदर्शनचरौ ।

इक्ष्वाकोर्वरसेनस्य तावभूतां सुताविह ।
नंदिषेणो बलः पूर्वं पुंडलीको हरिःपरः ॥ २४ ॥

त्याच राजाच्या वैजयती राणीपासून नंदिषेण बलदेव जन्मला व पुंडरीक वासुदेव होता.

पद्मावतीमिन्द्रपुराधीश्वरोपेंद्रसेनजाम् ।
तेस्मैदवन्तमाकर्ण्य सुकेतुर्वैरचक्रभृत् ॥ २५ ॥

इन्द्रपुरचा राजा उपेंद्रसेन याने आपली मुलगी पद्मावती पुंडरीकाला दिली. या लग्नाचे वृत्त ऐकून सुकेतूचा जीव जो निशुंभ नामे करून चक्रपुरचा राजा झाला होता, फार संतापला.

निशुंभाख्यः क्रुधा युध्यन्हतस्तेनाप संद्विपन् ।
हरिस्तमःप्रभां रामःशिवघोपाच्छिवं गतः ॥ २६ ॥

तो पुंडरीकाशीं लढण्यास गेला व त्याच्याकडून मारला जाऊन तम प्रभा नरकांत गेला. पुष्कळ वर्षे राज्यवैभव भोगून पुंडरीकही त्याच नरकांत गेला. त्याच्या वियोगामुळें नंदिषेणाला वैराग्य प्राप्त झालें. तो दीक्षा घेऊन तपश्चरण केल्यावर मोक्षाला गेला.

इति श्रीअरनाथसुभौमचक्रिनन्दिषेणबलपुंडलीकविष्णुतच्छत्रुनिशुंभवृत्तोक्तरष्टादशम् ॥ १८ ॥

---

प्राङ्मेरो कच्छकावत्यां वीतशोकपुरेऽधिराट् ।
योऽत्र वैश्रवणो जज्ञे स सुगुप्तगुरोर्गिरा ॥ १ ॥

१ पुंडरीक २ परिणीतवत ३ अर्द्धचक्री चक्रपुरपोपकश्च ४ युद्ध कुर्वन् सन् ५ पुंडरीकेण ६ सन् ७ षष्ठनरक गतः ८ जम्बूद्वीपपूर्वमंदरस्य ।

जंबूद्वीपात मेरुपर्वताच्या पूर्वेस कच्छकावती देशांतील वीतशोकपुरांत वैश्रवणनामक राजा राज्य करीत होता. सुगुप्ताचार्याकडून त्याने अणुव्रतें घेतलीं होतीं.

**उपात्ताणुव्रतोऽभ्यस्तरत्नत्रयविधानकः ।**
**जातु वर्षागमे द्रष्टुं वनश्रेणीं व्रजन्वटम् ॥ २ ॥**

तो रत्नत्रयव्रतधारी होता. एकदा पावसाळ्याचे प्रारम्भी वन शोभा पाहण्यास तो गेला असता त्याने एक वटवृक्ष पाहिला.

**पृथूदरोन्नतं दृष्ट्वा नानापक्षिकुलाकुलम् ।**
**प्रशस्याग्रवनं गत्वा रन्त्वागच्छन्निरीक्ष्य तम् ॥ ३ ॥**

त्यावटवृक्षाला बऱ्याच विस्तीर्ण फांद्या होत्या व बुंधा फार मोठा होता. त्यावर अनेक जातीच्या पक्ष्याचे थवे होते. वनशोभा पहात तसाच तो पुढे गेला. परतताना त्याने तो वटवृक्ष पुन्हा पाहिला.

**विद्युता भस्मितं प्राप्तवैराग्योऽनुचरंस्तपः ।**
**श्रीनागयतिसान्निध्ये तीर्थकृत्त्वमुपार्ज्य च ॥ ४ ॥**

त्यावर वीज पडून तो छिन्नविच्छिन्न झाला. त्यामुळे त्याला वैराग्य झाले. त्याने श्रीनागमुनीजवळ दीक्षा घेऊन तपश्चचरण केले व तीर्थंकर नाम कर्म बांधलें.

६ उपात्त सुगुप्ताचार्यवाचा गृहीत अणुव्रतं येन । ७ समूह व्यास ।

प्राप्तोऽपराजितं तस्माच्च्युतोऽत्रे मिथिलापतेः ।
वेङ्गे कुम्भस्य पुत्रोऽभूदिक्ष्वाकोः स्वर्करग्रहे ॥ ५ ॥

समाधिमरण साधल्यानंतर तो अपराजित नामक अनुत्तर विमानात अहमिंद्र झाला. पुढें याच भरतखंडात वगदेशात मिथिला नगरीचा इक्ष्वाकुवंशाचा राजा कुंभ व राणी प्रजावती याच्या पोटीं मल्लिनाथ नामें करून तो जन्मला.

पुरोपशोभां दृष्ट्वासौ श्रियं स्मृत्वापराजिताम् ।
विरक्तस्तपसार्हन्त्यं प्राप्तो मल्लिः पुनातु नः ॥ ६ ॥

आपल्या लग्नासाठीं शृंगारलेले नगर पाहून व अपराजित स्वर्गांतील वैभव आठवून मल्लिनाथाना वैराग्य उत्पन्न झाले व दीक्षा घेऊन धर्मतीर्थ प्रवर्तित केल्यावर ज्यानीं अर्हत्पद मिळविले ते मल्लिनाथ तीर्थंकर आमचे रक्षण करोत.

श्रीपुरेऽभूत्सुकच्छायां प्रजापालोऽत्र संश्रितः ।
उल्कापाताच्छैवगुप्तं तपो भुक्त्वाच्युतेन्द्रताम् ॥७॥

याच जंबूद्वीपात सुकच्छा देशातील श्रीपुरचा प्रजापाल नामक राजा होता. एकदा उल्कापात पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झाले. शिवगुप्त जिनराजाजवळ त्याने दीक्षा घेतली व बरीच तपश्चर्या करून तो अच्युत स्वर्गांत देव झाला.

१ भारते २ वगदेशे ३ प्रजावतीगर्भे ४ त्रिभुवनराजकन्यया सह विवाह नीति । ५ देशे ६ शिवगुप्ताचार्येण प्रोक्तं शैवगुप्तं ।

**काशीश·पद्मनाभस्य पुत्रोऽयं तृतीयेऽजनि ।**
**चक्री पद्मोऽब्दविलयात्संयमेच्छुः सुकेतुना ॥ ८ ॥**

तेथून तिसरा जन्म त्याने काशीचा राजा पद्मनाभाचे पोटीं पद्म नांवाने घेतला. तो चक्रवर्ती झाला. पुष्कळवर्षे राज्यवैभव भोगल्यावर एकदा आलेले ढग एकाएकीं नाहींसे झालेले पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झालें. तेव्हा सुकेतूने त्याला पुष्कळ नास्तिक विचार सांगून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला.

**कुलवृद्धेन चार्वाकमतेनेोक्त·प्रबोध्य तम् ।**
**सुकेत्वादिनृपैःसत्रा तपस्तेपे शिवोऽभवत् ॥ ९ ॥**

पण पद्म चक्रवर्तीने चार्वाकादि नास्तिक मताचे खंडन करून समाधिगुप्त नामक जिनराजाजवळ सुकेतु वगैरे राजासह दीक्षा घेतली आणि तो बरीच तपश्चर्या करून मुक्त झाला.

**वीरोऽयोध्याधिपोऽमात्यांद्विरम्यैतत्सुताविमौ ।**
**श्रीयोग्याविति तौ त्यक्त्वा स्नेहेन स्वानुजाय सः १०**

अयोध्येच्या राजास दोन पुत्र होते. पण त्याच्यावर राजाचे प्रेम नसल्यामुळे त्याने आपल्या भावाला युवराजपदावर बसविले.

**यौवराज्यपदं प्रादात्ततस्तौ कुपितौ भृशम् ।**
**मंत्रिणानेन तत्रावां निषिद्धावित्यतःश्रितौ ॥ ११ ॥**

१ काशीनृपस्य २ भवे ३ मेघ ४ चार्वाकमतत्यागानतरं सह ५ सिद्धो मुक्तात्माभवत् ६ पिशुनाम्नः ।

शिवगुप्ताद्धर्मतीर्थे तपःसौधर्ममापतुः ।
तत्राद्योऽग्निशिखक्ष्मांकुकाशीशोऽभूत्सुतो बलः ॥१२॥

हे कृत्य आमात्याचेच आहे अशी राजपुत्राची ठाम समजूत होऊन त्यांनीं त्याच्याशीं वैर बांधलें. पुढे त्यांनीं शिवगुप्त मुनिजवळ दीक्षा घेऊन तपश्चरण केले आणि समाधिमरण साधून सौधर्म स्वर्गात सुविशाल नामक विमानात देव झाले. तेथून काशीचा राजा अग्निशिखाला अपराजिताराणी पासून एक व केशवती राणी पासून एक असे दोन पुत्र झाले.

नंदिमित्रो हरिर्दत्त श्चैच्छोऽन्यो मंदिरे पुरे ।
मंत्री खद्रो बलीन्द्राख्य· सोऽभूत्क्षीरोदसंज्ञकम् १३

नंदमित्र बलदेव झाला व दत्त वासुदेव झाला. आमात्याचा जीव विजयार्ध पर्वतावर मंदर नामक नगराचा बलींद्रनामक राजा झाला.

याचमानो गजं लब्धमहाविघ्नेन मातुलात् ।
दत्तेनागाद्धत सोऽन्त्यं श्वभ्रं सारिर्बलोऽच्युतिम्

नंदिमित्राजवळ क्षीरोद नामक हत्ती होता. तो बलींद्राने मागविला. तुमच्या दोन मुली आम्हाला द्याल तर हत्ती देण्याचें पाहूं असें उत्तर त्यांनी पाठविल्यामुळे बलींद्र रागावला व तो लढण्यास आला. दत्त वासुदेवाची आई केशवती राणीचा भाऊ केसरी

१ श्रीधर्मनाथमताने २ अग्निशिखनाम्नो नृपस्य । ३ पिशुनमंत्रिचरः ४ दक्षिणश्रेणीसुरकांतारपुराधिपात् ५ मुक्तिं ।

[1]विक्रम नांवाचा सुरकाता नगरीचा राजा होता. या मामापासून सिंहवाहिनी व गरुडवाहिनी या दोन विद्या त्यानां मिळाल्या व त्याचे जोरावर दत्ताने त्या बलींद्राला ठार मारलें. नंतर दत्तहि मेला व तो सातव्या नरकात गेला. त्यामुळे खिन्न होऊन नंदिमित्रानेहि संभूत-भगवानाजवळ दीक्षा घेतली व तपश्चरण करून मोक्षाला गेला.

**इति श्रीमल्लिनाथतीर्थंकरपद्मचक्रीनंदिमित्ररामदत्ताख्यकेशवतच्छत्रुबलींद्रचरितावसानमेकोनविंशम् १९**

---

**हरिवर्मात्र चम्पेशःसर्वज्ञानन्तवीर्यतः ।**
**तत्त्वं श्रुत्वास्तसङ्गोऽभूत्प्राणतेन्द्रोऽन्त्यनामयुक्॥१॥**

अंगदेशातील चपापुरींत हरिवर्मा नावाचा राजा होता. अनंतवीर्य मुनिराजापासून बोध घेऊन त्यानें दीक्षा घेतली. षोडश-भावनाचे चिंतन करून त्याने तीर्थंकर नामकर्म बांधले. समाधि-मरण साधल्यानंतर तो प्राणत नामक चौदाव्या स्वर्गात इंद्र झाला.

**हरिवंशे सुमित्रस्य पुत्रो राजगृहेशिनः ।**
**स भूत्वा क्ष्माभवन्मेघगर्जितात्स्ववनस्मृतेः ॥ २ ॥**

राजगृह नगरींत हरिवंशाचा राजा सुमित्र राज्य करीत होता. त्याच्या पट्टराणीचे नांव सोमा तिच्या पोटीं मुनिसुव्रतनाथ जन्मास आले. एकदा मेघांचा गडगडाट सुरू झाला तेव्हा जंगलाचें स्मरण होऊन राजवाड्यातील हत्तीने खाणेपिणे सोडून दिले.

१ सोम.गर्भे ॥

गजं ग्रासमगृण्हन्तं श्रावयित्वा पुराभवम् ।
आसीत्तालपुरेशस्त्वं नाम्ना नरपतिर्नृपः ॥ ३ ॥
कुधी कुपात्रदानेन जातो हस्ती वनं स्मरेः ।
न प्राग्वृत्तमिति प्राप्यं श्रावकत्वं विरक्तवान् ॥ ४ ॥

ते वृत्त ऐकून मुनिसुव्रतनाथांनी पूर्वभवावली सांगितली. हे हत्ती तू तालपुरचा नरपति नामक राजा होतास. कुपात्री दान दिल्यामुळे या जन्मीं गज झालास. वनाचे स्मरण तुला होत आहे, पण पूर्वजन्म जाणित नाहींस तेव्हा आता श्रावकाची व्रते घे. तेव्हा गजाने ती व्रते घेतलीं.

प्रपद्य साम्यं कैवल्यं लब्ध्वा तीर्थं व्यधादसौ ।
मुनिसुव्रतनाथोनःसुव्रताय प्रसीदतात् ॥ ५ ॥

मुनिसुव्रतनाथानाहि हत्तीच्या व्रतग्रहणामुळे वैराग्य प्राप्त झालें. बरेंच तपश्चरण केल्यावर त्याना केवलज्ञान झाले. धर्मतीर्थ प्रवर्तित करून जे मोक्षाला गेले ते मुनिसुव्रतनाथ सुव्रतासाठी आमच्या वर प्रसन्न होवोत.

नराभिरामेऽनंतार्हत्तीर्थे नरपुरेश्वरः ।
सनत्कुमारं तपसा प्राप्य भोगपुर प्रभोः ॥ ६ ॥

अनंतनाथ तीर्थकराच्या वेळीं नरपुरनगरीचा राजा असलेला जीव समाधिमरण साधून सनत्कुमार नामक तिसऱ्या स्वर्गात सुविशाल विमानात देव झाला. तेथून भोगपुरचा राजा पद्मनाभ व राणी ऐरा यांच्या पोटीं तो जीव हरिषेण नावानें जन्मला.

---

१ स्मरसि २ न स्मरसि ३ प्रापयित्वा. ४ मनोहरे ५ तृतीय स्वर्ग ॥

इक्ष्वाकोःपद्मनाभस्य हरिषेणोऽभवत्सुतः।
तत्पितानन्तवीर्यशाद्यतिःस श्रावकोऽप्यभूत् ॥ ७ ॥

अनन्तवीर्य भगवान् मनोहर उद्यानांत आले असतां त्य च्य जवळ पद्मनाभ राजाने दीक्षा घेतली व हरिषेणाने श्रावकव्रते घेतलीं.

चक्रादीन्यसिधंस्तस्य पितुःकेवलसम्भवे ।
तं प्राच्यार्चितचक्रोऽसौ चिद्रत्नान्यापसप्त च॥ ८ ॥

पद्मनाभाला जेव्हा केवलज्ञान झाले तेव्हां हरिषेण चक्रवर्तीच्या आयुधशाळेत चक्र, छत्र, तलवार व दंड आणि कोठारांत काकिणी, चर्म व मणि अशी एकंदर सात अजीवरत्ने निर्माण झालीं व सात सजीवरत्नेहि प्राप्त झालीं.

निधीन्नदीमुखोत्थांश्च गणबद्धामरार्पितान् ।
भुक्तश्रीर्जात्वसौ राजा कृतनन्दीश्वरार्चनः ॥ ९ ॥

गणबद्ध नामक देव नदीच्या मुखातील नऊनिधि संपात्ति घेऊन आले. या सर्व देणग्याचा स्वीकार करून चक्रवर्ती पदाचा उपभोग घेतला व नंदीश्वराचे पूजन करता झाला.

अन्तेऽन्हु पोषितः सौधतलस्थो ग्रहणं विधोः ।
दृष्ट्वात्तदीक्षः श्रीनागात्तपसान्त्यां दिवं गतः॥

अनशन व्रत करून गच्चीवर बसला असता चंद्रग्रहण पाहून पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झालें. सीमंत पर्वतावरील श्रीनागमुनि

१ यीतरभूत् २ हरिषेणचक्री ३ सर्वार्थसिद्धिं ॥

जवळ दीक्षा घेऊन तपश्चरण केल्यावर तो सर्वार्थसिद्धि स्वर्गाला गेला.

जातौ दाशरथी रामलक्ष्मणौ बलकेशवौ ।
तद्वृत्तं बहुवक्तव्यमित्यतःपृथगुच्यते ॥ ११ ॥

दशरथ राजाला राम व लक्ष्मण नामक बळदेव व वासुदेव झाले. ते वृत्त फार मोठे आहे ह्मणून ते स्वतंत्रपणें सांगितले जात आहे.

## ॥ अथ रामायणम् ॥

जातोऽत्रान्त्यतनौ रत्नपुरे राज्ञःप्रजापते ।
सुतश्चन्द्रचूलस्तन्मित्रं विजयाख्यश्च मन्त्रितुक् ॥१२॥

याच भरत क्षेत्रातील मलयदेशात रत्नपुरचा प्रजापति व राणी गुणकांता यांना चंद्रचूल नामक मुलगा झाला. त्याचे प्रेम सचिवाच्या विजय नामक पुत्रावर फार होते.

विवाह्यमानां कौबेरीं श्रीदत्तेनातिशायिनीम् ।
कुबेरदत्तां श्रुत्वासौ समित्रो लातुमुद्यतः ॥ १३ ॥

रत्नपुरचा नगरशेट कुबेरानें आपली मुलगी कुबेरदत्ता त्याच नगरातील वैश्रवणशेठ व गौतमा याचा मुलगा श्रीदत्त याला देण्याचे ठरविले. ती फार सुंदर असल्यामुळे तिला पळवून आणण्यासाठी विजय नामक मित्रासह चंद्रचूल निघाला.

१ चरमशरीरस्य राज्ञः अंते भवा अंत्यातनुर्यस्य स २ कुबेरस्य वणिक्पुत्रीं ३ गौतमावैश्रवण पुत्रेण ४ महापापिष्ठ स्वानुचरात् ५ स्वगात्कर्तुं ।

वणिक्पूत्कारतो राज्ञादिष्टेन पुररक्षिणा ।
जिघांसितः स्वयं हन्तुं तं जित्वा मान्त्रिणो नृपम् १४
वध्यांवेवेति संरब्धं महाबलगणेशिना ।
संयमे लान्ततस्तीव्रं तपस्यन्पुरुषोत्तमम् ॥ १५ ॥

सर्व वाण्यानीं राजाकडे तक्रार केल्यावर राजाने ग्रामरक्षकास त्या दोघा युवकांचा वध करण्याची आज्ञा दिली. पण ग्रामरक्षकानें त्याना जिंकून राजाकडे आणले. प्रधानाने त्या दोघा युवकाना महाबल गणधरांकडे नेले. महाबलगणधराकडून ते दोघे मारले गेले अर्थात् त्याना दीक्षा दिली. दीक्षेनंतर ते खडतर तपश्चरण करूं लागले.

जित्वा दिश स्वनगरं विशन्तं वीक्ष्य केशवम् ।
ईदृग्भूयामितीर्ष्टश्रीस्तृतीयं कल्पमापिवान् ॥ १६ ॥

तेथील सोमप्रभ नामक राजाला सुदर्शना राणीपासून सुप्रभ व सीताराणीपासून पुरुषोत्तम असे पुत्र होते. ते दोघे प्रतिनाराय-णाला मारून आले होते. त्या केशव पुरुषोत्तमाला दिग्विजय करून येतांनां पाहून चंद्रचूलमुनीने आपणहि असे व्हावे असे निदान बांधले. मेल्यावर तो सनत्कुमारनामक स्वर्गात कनकप्रभ विमानांत विजयनामकदेव झाला. व विजय मुनि मेल्यावर त्याच स्वर्गातील मणिप्रभाविमानांत मणिचूलनामक देव झाला.

१ हतु वाञ्छितः २ कुमार ३ मारितौ गणेशिना ४ प्रयत्नाविष्टं यथा भवति तथा ५ सम्यग्यमभूमिं श्मशान पक्षे सयमभूमि चारित्र प्राति. ६ तपः कुर्वन् चन्द्रचूलः । ७ अनतजिनतीर्थे वीक्ष्य. ८ इष्ट श्रीर्यस्य ।

ततोऽनन्तरकाश्यां सुबालायां दशरथात्मजः ।
रामोऽस्मिन्[illegible]कोऽभूत्कैकय्यां लक्ष्मणो हरिः ॥१७

पुढे काशी नगरीचा राजा दशरथ व राणी सुबाला यांच्या पोटीं मंत्रिपुत्र विजयचा जीव रामनामें करून जन्मला. त्याच राजाला कैकयीराणीपासून राजपुत्राचा जीव लक्ष्मण नावानें झाला. राम बलदेव होता व लक्ष्मण वासुदेव.

महाकालासुरीभूतस्तपसा मधुपिङ्गलः ।
जघ्नेऽथ सुलसावैरात्सामात्यं सगरं द्विजैः ॥ १८ ॥

पूर्वी चक्रवर्ती हरिषेण तपानें सर्वार्थसिद्धिमध्यें जन्मल्यावर हजार वर्षांनीं अयोध्यानगरींत सगर नामें राजा झाला. सुलसा देवीच्या स्वयंवरास तो गेला असता मधुपिंगल नामक एक सुंदर कुमार तेथ आला होता. तेव्हा मत्सरग्रस्त होऊन त्याला त्यानें दूषित लक्षणाचा म्हटलें होतें. त्यामुळें चिडून मधुपिंगल स्वयंवरमंडपातून चालता झाला व त्यानें खट्टु होऊन दीक्षा घेतली. मेल्यानंतर तो महाकाल नामक व्यंतर देव झाला. तो सगराच्या वंशाचा अमात्यासह नाश करण्यास सज्ज झाला. व्यंतरदेव ब्राह्मणाचा वेष घेऊन सगराकडे येऊन म्हणाला. तुझ्या शत्रूंचा नाश व्हावा व राज्यलक्ष्मी वाढावी अशी तुझी इच्छा असेल तर तूं यज्ञ कर. मोहांध होऊन सगरानें यज्ञ केला व नरकांत पडला.

---

१ तृतीयकल्पात् २ चंद्रचूल ३ द्विजवेषधारी महाकालासुरः स्वयं ब्रह्मा भूत्वा पर्वतं आचार्ये कृत्वा शत्रुच्छेदलक्ष्मीनिमित्तयज्ञे हन्तिस्म ।

अस्मत्पुरी पुरेत्येत्य सतुग्दशरथोऽवसत् ।
आयोध्यां भरतं देव्यां शत्रुघ्नं जात्वजीजनत् ॥१९॥

राजानें काशी सोडून आपल्या वंशाच्या अयोध्येत वास्तव्य केलें त्याला एका राणीपासून भरत नामक पुत्र झाला व दुसऱ्या एका राणीपासून शत्रुघ्न झाला.

भारते धातकीखण्डे प्राचि सारसमुच्चये ।
देशे नाकपुरे राजा नरदेवो वृषश्रुतेः ॥ २० ॥

धातकीखंडांत भरतक्षेत्रांतील सारसमुच्चय देशात नाकपुरचा राजा नरदेव नामक होता. त्यानें धर्मोपदेश ऐकून अनत गणधराजवळ दीक्षा घेतली.

प्रव्रज्योग्रं तपः कुर्वन्खगेट्चपलवेगतः ।
कृत्वा निदानं सौधर्मे गत्वाऽतोऽजानि रावणः ॥२१॥

त्याने उग्र तप केले पण चपलवेग विद्याधराला पाहून त्याचें वैभव आपणाला असावें असे निदान केले व मेल्यानतर सौधर्म स्वर्गांत देव झाला. तोच पुढे रावण झाला.

पौलस्त्यःसप्रियो रन्तुं सोऽगाद्रूप्याद्रिकानने ।
विद्यासिध्युद्यतां तत्रालकेशामितवेगजाम् ॥ २२ ॥

जंबुद्वीपांत भरतक्षेत्रात विजयार्ध पर्वताच्या दक्षिणश्रेणीत मेघकूट नामक नगर आहे. तेथे विनिमींच्या वंशातील सहस्रग्रीव

१ पुरा पूर्वं एषा पुरी अस्मदीया इति कारणादेत्य आगत्य २ पूर्वं मदरे ३ अनताख्यगणेशात् ४ पुलस्त्यस्य अपत्य मेघाश्रिया।

विद्याधर राज्य करीत होता. त्याच्या पुतण्याने त्याला हाकलून दिल्यावर तो लंकापुरीस जाऊन राज्य करूं लागला. त्याचा मुलगा शतग्रीव याचें नंतर याचा मुलगा पंचाशद्ग्रीव गादीवर बसला. त्यांचें नंतर पुलस्त्यानें राज्य केले. त्याच्या राणीचें नांव मेघश्री. याना दशानन नामक पुत्र झाला. एकदा दशानन भार्येसह रूप्याद्रिकाननात गेला असता अलकापुरच्या अमितवेग राजाची मुलगी मणिमती विद्यासिद्धि करीत बसलेली त्याने पाहिली.

द्वादशाब्दोपवासार्तां दृष्ट्वा मणिमतिं क्षणात् ॥
कामार्तोऽविघ्नयदस्यैषापि वध्यासमात्मजा ॥ २३ ॥

बारावर्षे अनशनव्रत करीत असलेल्या त्या मणिमतीला पाहताच दशानन कामांध झाला व तिच्या व्रतात त्यानें विघ्न आणलें. तिने संतापून असे निदान बांधले कीं, मी याची मुलगी होऊन याला ठार मारीन.

भूत्वेममिति संकल्पाज्जाता मन्दोदरीसुता ।
तज्जन्मदिनभूकम्पाद्युत्पातात्स्वमृतिं विदन् ॥ २४ ॥

त्या संकल्पाप्रमाणे ती मंदोदरीची मुलगी झाली. ती जन्मल्या बरोबर भूकंप उत्पात वगैरे होऊन अनेक उपद्रव झाले. तेव्हा ही राजाच्या मुळावर आली आहे असे ज्योतिषानें सांगितले.

नत्वेमां क्वापि मुञ्चेति लङ्केणमारीचमादिशत् ।
तन्मुक्तां वीक्ष्य तद्गर्भमञ्जूषां मिथिलावने ॥ २५ ॥

---

१ विद्यासिद्धिमभ्रंशयत् २ आदिशब्दाद्भूभेददिवातारारात्रींद्रायुधजिनप्रतिमाचलनादि । ३ मारीचं मन्त्रिणा मुक्ता ।

त्या दुष्ट दशाननानें तिला कोठें तरी नेऊन सोडण्याची आज्ञा केली. एका पेटींत पुष्कळ द्रव्य व पत्रासह तिला ठेऊन मारीचानें नेली व मिथिलावनांत दूर नेऊन ती पेटी पुरली.

**कर्षद्भिस्तद्भुवं सीरैः सौधायानीय ढौकिताम् ॥**
**उद्घाट्य जनको लेखाज्ज्ञाततत्वो ददौ मुदा ॥ २६ ॥**

दैवयोगाने त्याच जागी घर बांधण्यासाठीं लोक जमीन नागरूं लागले असता त्यानां ती पेटी सापडली व त्यानीं ती जनक राजाला नेऊन दिली. पेटी उघडल्यावर पत्रावरून जनकाला सर्व कळले.

**सीताख्यां वसुधादेव्यै पण्डिता सा पुपोष ताम् ॥**
**सापि भूगेहगा प्रेम्ला गुणयन्ती कलाःकलाः॥ २७ ॥**

त्याने आनदाने ती मुलगी वसुधाराणीचे स्वाधीन केली. तिचे नाव सीता ठेऊन तिचें ती संवर्धन करू लागली व त्या बरोबर तिच्या कलाहि वाढू लागल्या.

**तां यौवनोल्लासतुङ्गां याचमानेषु भूरिषु ।**
**दृष्ट्वेमां जनकोऽन्येद्युःसदस्यूचे चमूपतिम् ॥ २८ ॥**

तारुण्याच्या उल्हासाने वाढत चाललेल्या तिला पाहून बरेच जण तिला मागणी घालू लागलेले पाहून सभेंत राजा कुशलमतीला म्हणाला.

१ हलैः २ आवासनिमित्त ३ मारिचि मंत्रिणी मुक्ता ४ पंडिता ५ यथा रावणो न वेत्ति ६ मनोहराः ७ कुशलमति सञ्ज्ञ ।

यज्ञे हुता प्राक्सुलसावाजीभसगरादयः ।
सदेहा स्वर्ययुरिति श्रूयते तत्क्रियेत सः ॥ २९ ॥

पूर्वी यज्ञात सगर. सुलसा, हत्ती, घोडे, हुत केले म्हणून ते सदेह स्वर्गाला गेले असे ऐकिवात आहे म्हणून तो यज्ञ करावा.

तच्छ्रुत्वाख्यत्स साध्वेतत्किंत्वेष विधिरासुर ।
विहन्यते नागखगैर्ध्रुवं शङ्कात्र रावणात् ॥ ३० ॥

राजाचें बोलणें ऐकून कुशलमति म्हणाला हा विचार चांगला आहे. हा यज्ञ महाकाळासुराने सांगितला आहे. त्याचा नाग, खग वगैरे वंशाचे लोक व रावण विध्वंस करील अशी शंका आहे.

सीता रामाय दास्याम इत्युक्त्वा रामलक्ष्मणौ ।
तद्रक्षार्थं तदानेया मिथिलेशस्तदाशृणोत् ॥ ३१ ॥

रामाला आम्ही सीता देऊ असे सांगून रामलक्ष्मणांना यज्ञ रक्षणासाठी आणावें. कुशलमतीचें हे बोलणे जनकाने मान्य केलें.

दूतात्तदुक्तं श्रुत्वाप्तैः कोशलेशो व्यचारयत् ।
तं च श्रेयोऽनुबन्धित्वात्तदा पुंर्ध्युभजन्मरवम् ॥ ३२ ॥

कोशल देशाला दूत आमंत्रणासाठीं पाठविण्यात आला. दशरथ राजानें सल्लामसलत केळी. सर्वांची संमति मिळाल्यानंतर त्यांना पाठविण्याचें ठरलें.

१ महाकालासुरेण प्रोक्तः २ विघ्नते ३ जिनशासनपक्षपातीयैर्नागैः खगैर्नायानुरज्यमतृवान् ४ चमूपतिवाक्यमभ्युपगच्छातिस्म ५ जनक सदष्ट ६ पुरोहितमंत्रिप्रमुखैःसह ७ दशरथः ८ आप्ताः ९ रामलक्ष्मणयोर्यज्ञरक्षार्थं मिथिलायां प्रयाण १० मन्यते स्म. ११ व्याचक्षुरायांनापविभागेन

**वैराग्यक्षान्त्यनशनैःकामक्रोधोदराग्निषु ।**
**हुतात्मयज्ञं निर्वान्ति वनस्थाःश्रमणा इति ॥३३॥**

कामाग्नि, क्रोधाग्नि व उदराग्नींमध्यें वनांत राहणारे श्रमण अनुक्रमाने वैराग्य, क्षांति व अनशन या आहुती देऊन आत्मयज्ञ करतात व मुक्त होतात हा आर्षयज्ञ होय.

**आर्षोऽनार्षःस यत्रार्हद्गणिकेवलिवर्ष्मणाम् ।**
**संस्काराग्निषु गन्धादीन्हुत्वा सिध्यन्ति गेहिनः ॥३४**

तीर्थकर, गणधर व इतर केवलीच्या शरीरांच्या संस्काराग्नींत गंधादिके करून गृहस्थ यज्ञ करून सिद्ध होतात हा अनार्ष यज्ञ होय. असे हे यज्ञाचे आर्ष व अनार्ष नामक दोन प्रकार आहेत.

**हिंसायागन्तु सगरविश्वभ्वादिद्विषां व्यधात् ।**
**दुर्गत्यै पर्वतमुखेनासुरस्तत्स दूष्यताम् ॥ ३५॥**

राजा सगर व त्याचा मंत्री विश्वभू वगैरेंचा द्वेष्टा महाकाल नामक व्यंतरदेवाने त्याना दुर्गति प्राप्त व्हावी म्हणून पर्वताच्या द्वारे हिंसात्मक यज्ञ सुरू केले ते दुर्गतिलाच कारण होतात. क्षिरिकदंब ब्राह्मणाजवळ त्याचा मुलगा पर्वत, नारद नामक परदेशी विद्यार्थी व राजपुत्र वसु विद्यापारंगत झाले. पर्वत शब्दाचे अर्थ विपरीत करीत असे त्यामुळे तो टीकेस पात्र होई

१ नृलोके सिद्धाः सिद्धयति सेत्स्यान्ति. २ तीर्थकरगणधरेतरसर्वज्ञ शरीराणा हुत्वा विधिवत्प्रयुज्य सिद्धयति क्रमेण मुच्यत ३ सगरमन्त्रिमंदोदरप्रमुख ४ अश्रद्धेयतया रामस्योपदिश्यता ।

अजैर्होतव्यमित्यत्र नारदेन तिरस्कृतः[1][2][3] ।
पर्वतोऽसुरतो यज्ञे तीर्थे सोऽघातयत्पशून् ॥ ३६ ॥

तीन वर्षाच्या जुन्या यवधान्याने यज्ञ करावा. कारण त्या यवाना अङ्कुर फुटत नाहींत व ह्मणून ते हिंसेस कारण होत नाहीं असा नारदाने अर्थ केला. अज ह्मणजे यव नसून बकरा होय व होमांत त्याचा बळी द्यावा असा पर्वताने अर्थ केला व तो यज्ञात पशूचा घात करू लागला त्यामुळे पर्वत सर्वाकडून तिरस्कारला गेला.

महाकालश्चतुःषष्टिसहस्रासुरराट्शठः ।
[4]तं कृत्वाध्यापयत्षाष्टिमृच्सहस्राण्यथर्वणि ॥ ३७ ॥

महाकाल व्यंतरदेवाने अथर्ववेदात साठ हजार ऋचा बनवून पर्वताला पढविल्या.

वसुःश्वभ्रमजैश्छागैरिति साक्ष्या[5] सपर्वतः ।
सर्वार्थसिद्धिं चाहिंसाधर्मेण नारदोऽगमत् ॥ ३८ ॥

वसु राजाने मोहवश होऊन पर्वताच्या मतासच रुकार दिला. ते सर्व नरकात गेले. अहिंसाधर्मामुळें नारद मात्र सर्वार्थसिद्धिनामक स्वर्गाला गेला.

रामोऽथ सर्वसामग्र्यापित्रादिष्टःसलक्ष्मणः ।
गत्वा विदेहास्तद्भर्तुं[6] क्रतुं निष्ठाप्य तत्सुताम् ॥ ३९ ॥

१ यवबीजं च त्रिवर्षमजामित्यभिधीयते । तद्विकारेण सप्तार्चिर्मुखे देवार्चनं विदुः २ क्षीरकदंबोपाध्यायशिष्येण देशांतरायातेन ३ शिष्टसभायां गर्वमत्त प्रमाणवचनेन निगृहीतः । ४ तं पर्वतं पाठयति स्म ५ साक्षीदानेन ६ जनकस्य ।

दशरथाच्या आज्ञेवरून सर्व सामग्रीसह रामहि लक्ष्मणाला बरोबर घेऊन विदेह देशाला गेला. तेथील जनक राजाला यज्ञात मदत करून त्याच्या मुलीशीं लग्न करून आला.

विवाह्योद्धश्रियं प्राप्त साकेतं परिणायितः ।
तातेनान्या राजकन्याःसप्त षोडश लक्ष्मणः ॥ ४० ॥

लग्नानतर राम अयोध्येला परत आला तेंव्हा वसतऋतु सुरु झाला. दशरथानें आणखी सात कन्याशीं रामाचें लग्न लावले व सोळा कन्याशीं लक्ष्मणाचे लग्न लावले.

दे[१]वोदितोदितं का[२]र्यं गत्वा कुर्वीत सानुजः ।
इति रामेण विज्ञप्तोऽमुञ्चद्युक्त्योदितःपुनः ॥ ४१ ॥

लक्ष्मणासह रामाने क्षात्रियोचित देवकार्य केले. काशींत राज्य स्थापण्यासाठीं जाण्यास रामाने परवानगी मागितली असता प्रथम मोहानें दशरथाने ती नाकारली. पण युक्तीने समजाविण्यात आलें.

राज्येऽभिषिच्य तं तातो यौवराज्ये च लक्ष्मणम् ।
विभूतत्त[३]ादधिष्ठा[४]यं काशीमत्युदितो भृशम् ॥ ४२ ॥

दशरथाने रामाला राज्याभिषेक केला व लक्ष्मणाला युवराज-पद दिले. आणि आता काशींत राज्य स्थापा म्हणून दशरथाने त्याना सागितले. तेथें त्याची अतिशय उन्नति झाली.

गत्वा नन्दनवच्चित्रकूटाख्ये जातु तद्वने ।
क्रीडित्वा प्रेयसीयुक्तौ स्थिताविन्द्रप्रतीन्द्रवत्॥ ४३ ॥

---

१ गुरुपरपरायातकार्यं २ क्षत्रियधर्मादिसमर्थनोक्त्या ३ तत्तस्माद्राज्याभिषेकानतर ४ उद्दिश्य काश्यामधिष्ठात व्यमेवेति सकल्य ।

काशींत राज्य स्थापून नंदनवना प्रमाणें सुंदर चित्रकूट न वनात राण्यासह इंद्र व प्रतींद्राप्रमाणे रामलक्ष्मण क्रीडा करते झाले.

**नारदस्तौ तथा दृष्ट्वा चरणैषी प्राप्य रावणम् ।**
**प्रलोभ्य सीतारूपोक्त्या चक्रे तं हर्तुमुत्सुकम् ॥४४॥**

कलहप्रिय नारदाने त्याना तसे आनदमग्न पाहिले व रावणाकडे जाऊन सीतेच्या रूपाची त्याच्यापुढे इतकी स्तुति केली कीं तो लोभाविष्ट होऊन तिचे हरण करण्यास उत्सुक झाला.

**मुक्तयां शूर्पणखया वृद्धयान्वीक्ष्यंबोधिताम् ।**
**सीतां हृतां समारीचःपुष्पकेणासदत्स खे ॥ ४५ ॥**

त्याने मारीचाशीं चर्चा केली व शूर्पूणखेला सीताहरणाचे कानावर पाठविले. त्या म्हाताऱ्या शूर्पूणखेने सीतेला शोधून काढली. ती रामावर पूर्ण अनुरक्त असून शीलवती आहे असे तिने रावणास सांगितले. तेव्हा तो स्वत चिढून पुष्पक विमानात बसून मारीचासह निघाला.

**तेन मारीचहेमेणात्सा रामेण वियोजिता ।**
**तद्रूपेणाश्वगतं स्वं नत्वा शिविकया वनम् ॥ ४६ ॥**

मारीचाने हेममृगाचे रूप घेऊन रामाला सीतेपासून मृगयामिषाने दूर नेलें आणि रावणानें रामाच्या रूपानें येऊन पालखींतून नेतिला नेलें.

---

१ मारीचेन सह मन्त्रयित्वा प्रेषितया २ पतिव्रतात्वेन परीक्ष्य सबोधिता सीता तद्वचनाविरक्ता ।

**तद्वृत्तं श्राविता शोकान्मूर्च्छितोन्मूर्च्छ्यै लोभिता ॥**
**खगीभिरुज्झवागुक्तौ रामक्षेमश्रवावधि ॥ ४७ ॥**

लंकेत आल्यावर रावणाने रामरूप सोडले. तेव्हा त्याला पाहून ती मूर्च्छित झाली. ती शुद्धीवर आल्यावर विद्याधर स्त्रिया तिची समजूत घालू लागल्या. पण रामाचे कुशल कळेपर्यंत मी कांहीं बोलणार नाही असे म्हणून तिने मौन धारण केले.

**तदोत्पातोदयादानशासतः पथ्यमाक्षिपत् ।**
**शस्त्रशालां द्विचक्रां नाज्ञासीत्स द्विगुणोदयः ॥४८॥**

तेव्हा लंकेत सर्वत्र उत्पात होऊ लागले. रावणाच्या आयुधशाळेत उत्पात करणारे चक्ररत्न निर्माण झाले. त्या चक्राचे फळ त्याला माहीत नव्हते. त्या सीतेचा स्वीकार करूं इच्छिणाऱ्या रावणाला तिला सोडून देणेच पथ्यकर आहे म्हणून सुज्ञांनी सांगितले.

**गृहीत्वा रोहिणीं राहौ गतेऽभ्राम्यच्छशीत्यहम् ।**
**स्वप्नेऽद्राक्षमिति प्रश्नाद्धृतेत्या जानकी गते ॥ ४९ ॥**

इकडे मायामृग नाहीसा झाल्यावर राम चित्रकूटवनात परत आले व सीता तेथे नाही असे पाहून दुःखी झाले. त्या रात्रीं दशरथाला स्वप्न पडले की राहूने रोहिणीला नेल्यावर चंद्र उगाच

१ चेतना प्राप्य. २ प्ररोचनावाक्यैः स्वराज्यादिक प्रतिदर्शितलाभ सा अधोमुखी ३ त्यक्तगीर्जाता मौनेन स्थिता ४ अह उक्ता भवामि राम कुशलवार्ताश्रवणानंतर अहं ब्रुवे नान्यथा ५ ग्रहण । सीतास्वीकरणःकथकस्य ६ प्राह । ७ द्वितीय रथाग तस्योत्पातभूतं न जानाति स्म ॥

भटकत होता. या स्वप्नावरून जानकीला घेऊन रावण गेला असे समजले.

> रावणे राघवो वाराणस्यां दिष्टं पुरोधसा ।
> पित्रा प्रस्थापितालेखादाश्वस्त सोऽरुपद्विषे ॥ ५० ॥

पुरोहितानें रामाला काशीत ते स्वप्न सांगितले. पित्यानें उल्लेखिलेल्या स्वप्नाच्या अर्थावरून रावणाने सीता नेली हे नक्की कळल्यामुळे शत्रूवर राम खूप रागावला.

> अथेत्य नेमतुः खेटौ तं तत्रैकोऽवदत्प्रभो ! ।
> सुग्रीवोऽहं सुहृन्मेऽयं विक्रान्तोऽमितवेगवाक् ॥५१॥

इतक्यात दोन विद्याधरांनीं येऊन रामाला नमस्कार केला. त्यांपैकी एक म्हणाला, हे प्रभो ! मी सुग्रीव व हा माझा पराक्रमी मित्र अमितवेग.

> खगान्त्यपाक्किल्किले रामवाली सङ्गाग्रजः ।
> पुरे क्रमागताद्यौवराज्यात्तेनाहृतो गतः ॥ ५२ ॥

विजयार्ध पर्वताच्या दक्षिणेस असलेल्या किलकिल नामक नगरात बलींद्र विद्याधर राज्य करीत होता. त्याला प्रियंगूसुंदरी राणीपासून वाली व सुग्रीव नामक दोन पुत्र झाले त्याने राज्य सोडताना वालीला गादीवर बसवून मला युवराजपद दिलें. पण वालीने तेहि हिरावून घेऊन मला हाकलून दिले.

> सम्मेदे नसरवा प्राच्यं जिनार्चास्तत्र नारदात् ।
> ज्ञात्वा पदाप्ति त्वत्पादत्रागां तत्प्रसीद भो · ॥५३॥

एकदा मी मित्रासह सम्मेदशिखरास गेलो असता जिनपूजन केले. तेथे नारदाकडून कळले की रामचंद्रापासून आम्हाला स्वपद-प्राप्त होईल म्हणून आम्ही सेवेसाठी हजर झालो आहोत तर महाराज आमच्यावर कृपा करा.

**प्रेषो ममेत्यादिशच्चैनं प्रियां मे गवेषय।**
**तदुक्तो हनुमान्लङ्कां गत्वा भूत्वालिरभ्रमत् ॥५४॥**

तर मग मी तुह्माला पाठवितो. माझ्या प्रियेचा शोध करा असे रामाने सांगितल्यावर हनुमान लंकेला गेला व तेथे भृंगाच्या रूपानें फिरू लागला.

**वनेऽथतां शिंशपाधोऽद्राक्षीद्रामोक्तलक्षणाम् ॥**
**सप्तमेऽन्हि तदात्रैत्य प्रदोषे मञ्जरीगिरा ॥ ५५ ॥**

तेव्हां त्याने रामाने सांगितलेल्या लक्षणानी युक्त अशी सीता शिसवीच्या झाडाखाली बसलेली पाहिली. सीतेला आणून सात दिवस झाले होते ह्मणून तिचे मन पालटले की नाहीं ते पहाण्या-साठी रावणाने मंजरीनामक दासीला सायंकाळी पाठविले.

**स्वयं चाभ्यर्थितां सीतामनिच्छन्तीं क्रुधा स्त्रगेद् ।**
**तां जिघांसुर्निषिद्धोऽगान्मन्दोदर्या दुराग्रही ॥ ५६ ॥**

मंजिरीने सीतेला समजाविले की रावणाला पाच हजार राण्या असून तुला तो चाहतो व तो तुला पट्टराणी करील. आता रामाची

१ कगादिना ताडितुमिच्छुः । २ स्वस्थानं गतः ३ सीता भव्या-म्येवेतिग्रहाविष्टः ।

आगा सोट. तिचें तिनें ऐकलें नाहीं ह्मणून क्रुद्ध होऊन रावण स्वतः शाप्त व ह्मणाला कीं, तूं न मानशील तर तुला मी वटीक वनर्बान व ठार मारीन. तरीहि ती वश होईना. तेव्हां तिला मारण्याचें ठरविलें. पण मदोदरीनें त्याचा निषेध केला. तेंव्हा तो दुराग्रही रावण निघून गेला.

साध्वी चेतसा जनन्या सतीधुर्ये प्रसीद माम् ।
शुश्रूषन्न रक्ष वपुःपत्या शुश्रूषस्वेत्युक्तापि नाब्रवीत् ५७

हे सतीशिरोमणे माझ्यावर प्रसन्न हो. आपल्या देहाचें रक्षण करून घे व आहार घे तुझी रामचंद्राशी भेट होईल असें पुष्कळ विनविलें तरी ती बोलली नाहीं. मदोदरीनें त्याला तिला रामाकडे पाठीव असाच सल्ला दिला.

माता त्वेषा ममेत्यास्थाचिन्तयती प्रघट्टकम् ।
तत्रान्यैष्वपि यातेषु वानरीभूय रक्षकान् ॥ ५८ ॥

मंदोदरीला आपल्या मुलीची आठवण झाली व रावणाच्या सुखावर आलेली ती मुलगीच ही सीता तर नसेल असा तिला संशय आला. ही मला आईसारखीच वाटते असा विचार करीत सीता बसली असता व मदोदरी निघून गेल्यावर वानरी विद्येनें वानर बनून व द्वारपालकाना दूर हाकलून हनुमान सीतेजवळ गेला.

दूरीकृत्याणुमान्नत्वा श्रीवत्साङ्ककरण्डकम् ।
मुक्त्वाग्रे कुशली राम इत्यूचे तामदृश्यच्छलम् ॥५९॥

१ मदोदर्या २ रामेणैतच्छरीर योजय ३ परिवारजनेषु ४ प्रसरे-णुमात्रमाकारमास्थायदृश्यमात्रमल्पम् ।

सर्व अडथळे दूर करून व नमन करून हनुमानानें श्रीवत्सांककरण्डक तिच्यापुढें ठेवला. व रामकुशल आहे असें त्यानें सांगितलें.

न वेत्युद्धाव्य तद्रामनामाङ्कां वीक्ष्य मुद्रिकाम् ।
स्वैकगम्यं च पत्रार्थं निश्चित्यासौ मुदाऽलपत् ॥ ६०॥

हा रूपांतर करून आलेला रावण तर नव्हे अशी सीतेला शंका आली. पण रामनामांकितमुद्रिका पाहून व पत्रातील आशय जाणून तिची खात्री झाली व ती ह्मणाली—

मे त्वं पितेति सोऽवादीन्नैवं त्वं स्वामिनी मम ।
शक्नोम्यद्यैव नेतुं त्वां परं नाज्ञात्र मे प्रभोः ॥६१॥

तूं मला वडिलासारखा आहेस. तेव्हां हनुमान ह्मणाला. नाहीं. तूं माझी धनीण आहेस. आजहि मी तुला नेऊ शकतो. पण रामाची मला तशी आज्ञा नाहीं.

हत्वारिं नेष्यतांशस्तां तच्छ्रियाभोज्यमम्ब तत् ।
ॐइत्युक्त्वा तया मुक्तःप्रगेद्रात्य स प्रभुम् ॥ ६२ ॥

तो शत्रुचा नाश करूनच त्याच्या संपत्तीसह सती अशा तुला घेऊन जाईल व त्यामुळें त्याची कीर्ति होईल. ह्मणून हे माते ? तूं आहार सेवन कर. तिनें त्याचें ह्मणणें मान्य केले व तिचा निरोप घेऊन सकाळीं हनुमान रामाकडे आला.

---

१ आत्मनैव ज्ञातु योग्य । २ प्रशस्ता त्वा ३ अंगी कृत्य ४ विवर्जितः ५ प्रगे-प्रभाते ।

सीता दृष्टेति पृच्छन्तं नत्वा दृष्टेत्युवाच सः ।
तस्मै सैनापत्यमधिराज्यं चेन्द्रतुजे ददौ ॥ ६३ ॥

सीता पाहिलीस काय म्हणून रामाने विचारताच होय पाहिली म्हणून हनुमानानें उत्तर दिले व सर्व समाचार सांगितला. तेव्हा रामाने त्याला आपले सेनापति पद देऊन सुग्रीवाला आधिराज पद दिले.

सोऽमुक्त्वांगदमत्रेत्वं सीतां याच्योऽनुकूल्य सः ।
विभीषणेन भोज्याच सेत्युक्त्वा संखगेट् भटम् ॥६४

अंगद म्हणाला कीं, सामदामादि मार्गाने प्रथम सीतेला मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. लंका विभीषणची आहे. त्याच्याकडून रावणाला समजाविले पाहिजे. तेव्हा विजय, कुमुद, रविगति मनोवेग वगैरे सह तो विद्याधर हनुमान रामाकडून पाठविला गेला.

गत्वारिस्तेन साम्नोक्तो योग्यं मे सोऽवेगम्यमाम् ।
स्त्रीरत्नं स्वीचकारेतु मां जित्वैतन्नयत्वितु ॥६५॥

शत्रू जवळ जाऊन तो साम्यनीतिने त्याच्याशीं बोलला. पण रावण म्हणाला कीं, हे रत्न माझ्याच साठी आहे. म्हणून मी हरण करून आणलें आहे. रामाला मला जिंकूनच तिला न्यावे लागेल. एरव्हीं मी त्याग करण्यास तयार नाहीं.

१ सुग्रीवाय २ अणुमान ३ पुनः प्रेषितः ४ भवान् रावणानुजो विभीषण ५ लंका भोक्ता भविता ६ मनोवेगादि विद्याधरभट चतुष्टययुक्त रावण प्रति गत्वा ७ नवगः ८ राम मा जित्वा स्त्रीरत्न स्वीचकार तर्हि एतु आगच्छतु राम. ९ स्त्रीरत्न ।

**भ्रुवं श्वा क्षिप्त उत्कुप्य भटैर्निर्वासितोऽमुना ।**
**मुक्तो विभीषणेनार्यां पारयित्वा तथैत्य सः ॥६६॥**

हनुमानानें रावणाला यथेच्छ तिरस्कारिले व धिक्कारिलें. तेव्हा रागावून रावणाने त्यास धक्के मारित हाकलून दिले. पण बिभीषणाने हनुमानाचे सांतवन केले. हनुमानाने मदोदरी तर्फे सीतेला आहार घेण्यास लावले. मग तो रामाकडे परत आला.

**तद्दण्डेऽद्रुढयद्रामं प्रस्थायाथ शरद्यसौ ।**
**निर्मूल्य वालिं नीत्वात्र सुग्रीवं तत्पदे व्यधात् ॥६७॥**

हनुमानानीं सागितलेले हे वर्तमान ऐकून रावणाचा बीमोड करण्यासाठीं रामाने सेना सज्ज केली व शरद्रुतूत तो निघाला. सुग्रीवाला युवराजपदावरून व हनुमानाला सेनापतिपदावरून काढा. मी तुम्हाला सर्व मदत करतो असे वालीचे आलेले पत्र अमान्य करून रामानें त्याला ठार मारून सुग्रीवाला गादीवर बसविले.

**सिद्धप्रज्ञप्तिना सोऽपि भक्तैर्विद्यैःखगैर्वृतः ।**
**सज्जभूखेचरचैययोंऽधृष्यैः शत्रुमध्यगात् ॥ ६८ ॥**

१ हनुमता भेददडवाग्भिस्तिरस्कृतः शुनकवत् २ उत्कुष्ट कुद्ध्वा । ३ सभायाः सगलग्रह निःकाशितः ४ समाश्वास्य विसृष्टः ५ सीता ६ अष्टमदिने मदोदर्या कृत्वा पारणा कारयित्वा ७ दडैकसाध्यो रावणः ८ रामस्य प्रयाणं कारयित्वा ९ खदिरनने हत्वा १० वालिराज्ये. ११ तत्कालसाधितप्रज्ञप्ति विद्येन सुग्रीवेण १२ तत्क्षणाराधितपूर्वसिद्धविद्याकैः १३ कोटिचतुरशीति लक्षा संख्यै भूगोचरैः, अर्धाष्टकोटिसंख्यैश्च खेचरैर्बलैर्वृतः १४ रामः ।

प्रज्ञप्तिनामक विद्या ज्याला साध्य आहे असा सुग्रीव, निरनिराळ्या विद्या ज्यांनीं हस्तगत केल्या आहेत अशा अनेक विद्याधरासह आणि पायदळ चार कोटी श्याशीलक्ष सेना घेऊन रामाबरोबर निघाला व ते सर्व शत्रूजवळ आले.

नानिच्छन्तीमभजेयान्यां स्त्रीमित्येकव्रतस्य ते ।
सीता सुताग्र्यवंशस्य युक्तात्मीया न वांछितुम् ॥६९॥

नाखूष असलेल्या परस्त्रींचा मी अंगिकार करणार नाहीं असें व्रत असलेल्या तुला हे राजा आपली मुलगी सीता भोगण्याची इच्छा धरणें बरें नव्हे. आपल्या सुवंशाला हे शोभत नाहीं असें रावणाला विभीषण ह्मणाला.

तद्रामायार्प्यतां नीत्वेत्याचक्षाणःसुहृत् क्रुधा ।
भ्रात्रा निर्वासितोऽभ्येत्य श्रितो रामं विभीषिणः ७०

ह्मणून तिला रामाकडे नेऊन दे असा त्यानें सल्ला दिला. त्यामुळे रागावून रावणानें विभीषणाला हाकलून दिलें. ह्मणून त्यानेंहि रामाचा आश्रय घेतला.

अथोपाब्धिनिविष्टेन रामेणानुमतोऽणुमान् ।
कपिसैन्यैर्वनं भंक्त्वा दग्ध्वायातो वहिःपुरम् ॥७१॥

समुद्राजवळ आल्यानंतर रामाच्या आज्ञेवरून हनुमान वानरसेनेकडून वन तोडून व लंका पेटवून आला.

---

१ भाग्यमानः २ भ्राता ३ सागरतटे ४ देवाद् गत्वो परिभ्रमामीति ज्ञानः ५ बहिरिका लंका ।

**तत्सुग्रीवाप्तविद्यौ तल्लंघितांब्धी बलासुतौ ।**
**आवास्योपपुरं वीरेण द्विषां सिद्धिमास्थताम् ॥७२॥**

सुग्रीवाकडून प्राप्त झालेल्या विद्याबलाने समुद्र तरून जाऊन राम व लक्ष्मण शत्रुनगरीजवळ आले. हनुमानामुळे त्यांना या कामांत यश आले.

**ततोऽरिणा कृता सहरणेनेत्याक्षिपत्क्रुधा ।**
**चक्रमादाय तच्छीर्षं चिच्छेद लक्ष्मणोऽनु तत् ॥७३॥**

रामलक्ष्मणांनीं रावणाबरोबर घनघोर युद्ध केले. तेव्हा रावणाने रागाने सोडलेले चक्रच घेऊन लक्ष्मणाने त्याच्यावर फेकलें. व त्याचा शिरच्छेद केला.

**प्रीत्यार्प्तैर्योजितो रामः सीतयारिपदे न्यधात् ।**
**बिभीषणं सुरैर्गाङ्गैरभिषिक्तश्च लक्ष्मणः ॥ ७४ ॥**

रामाला त्याची सीता त्याच्या आप्तजनांनीं भेटविली. रावणाच्या राज्यावर बिभीषणाला बसविले व लक्ष्मणाला देवानी त्रिखंडाधीशपदावर अभिषेक केला.

**कोटिकारव्यशिलोद्धृत्या तुष्टांद्दिव्यासिमीप सः ।**
**स्वानन्दात्साग्रजो जित्वा दिशोऽयोध्यां श्रितोऽतपत्७५**

---

१ ताभ्यां सुग्रीवहनुमद्भ्यां प्रज्ञप्तिकृतविमानेनावतारितसमुद्रौ २ रामलक्ष्मणौ ३ सैन्यं बहिर्मुक्त्वा ४ सुभटेन शत्रूणा द्विषा हनुमता कृत्वा ५ रावणेन ६ क्षिप्तं ७ चक्रं ८ सुग्रीवबिभीषणादिभिः ९ गंगाजलैः १० हर्षं प्राप्तात् ११ सौनंदनामानं ।

कोटिका नामक शिला लक्ष्मणाने उचलली तेंव्हा सुनंद नामक यक्षानें सतुष्ट होऊन सौनंद नावाची खास तलवार लक्ष्मणाला दिली. तेथून ते अयोध्येकडे जाऊन राज्य करू लागले.

एकदा सपरिवार[1] शिवगुप्ताजिनाद्धलः ।
धर्मं श्रुत्वा सानुजोऽभूदिष्टिमाप्य[2] प्रभायुतः ॥ ७६ ॥

त्यानीं मनोहर नामक वनात शिवगुप्त जिनराजापासून सद्धर्माचे श्रवण केले. जिनपूजन वंदन करून ते तेजस्वी वनले.

तत कतिपयाब्दान्ते साकेतेऽन्यौनुजौ[3] प्रभूँ[4] ।
कृत्वा काशीं गतौ पुत्रपौत्राद्यैस्तौ[5] ननन्दतुः ॥ ७७ ॥

भरत व शत्रुघ्न या बंधूसह अयोध्येंत काही वर्षे राज्यवैभव भोगून व त्याना राज्य देऊन रामलक्ष्मण काशीला गेले व तेथे पुत्रपौत्रासह आनदात राहिले.

दृष्टस्वप्नत्रयो[6] मृत्वा महारोगेण लक्ष्मणः ।
गतो रावणवच्छ्भ्रं तच्छोकान्ते प्रबुद्धधीः ॥ ७८ ॥

एकदा लक्ष्मणाला तीन स्वप्ने पडलीं. मस्ती आलेल्या हत्तीनें मोठा वटवृक्ष पाडला हें एक. राहूने ग्रासलेला सूर्य रसातलाला गेला हे दुसरे. एका चुनेगच्ची राजवाड्याचा एक भाग पडला हें तिसरें.

---

१ सीतासुग्रीवादियुक्त. २ रामः दृष्टिमाप्य प्रभया तेजसा युतोऽभवत्. ३ भरतशत्रुघ्नौ ४ स्वामिनौ ५ सेवितौ ६ मत्तेभ भग्नवटो, राहुग्रस्तेन्दोर्भूपात . प्रासादैकदेशभगश्चाद्येन लक्ष्मणस्य महारोगेण मरण द्वितीयेन रावणस्य विनाश तृतीयेन रामप्रव्रज्या च पुरोहितेन रहस्युक्तः ।

पहिल्या स्वप्नाचे फल ह्मणून लक्ष्मणाला असाध्य रोग झाला. दुसऱ्या स्वप्नामुळे वैभव नष्ट होईल व तिसऱ्या स्वप्नाचे फल ह्मणून रामचंद्र दीक्षा घेईल. त्याप्रमाणेंच घडले. रावणाप्रमाणे लक्ष्मण-मेला व त्याच्या शोकामुळे प्रगल्भबुद्धीच्या रामाने दीक्षा घेतली.

**लाक्ष्मणौ पृथिवीचन्द्रे राज्यं न्यस्याञ्जितंजये।**
**सीतात्मजेष्टमे यौवराज्यञ्च मिथिलैश्यवत् ॥ ७९ ॥**

लक्ष्मणाचा मुलगा पृथ्वीचंद्र याला गादीवर बसविण्यांत आले सीतेच्या सर्वांत लहान अजितजय नामक आठव्या पुत्राला युवराज-पद देण्यात आले. मिथिलादेशहि त्याच्याच वाट्याला आला.

**साकेतमेत्य सिद्धार्थवने श्रित्वा बलस्तपः।**
**शिवगुप्तजिनात्सिद्धः सम्मेदेणुमदादियुक् ॥ ८० ॥**

नतर रामचंद्र अयोध्येला गेले व शिवगुप्त जिनराजापासून दीक्षा घेऊन त्यानीं खूब तपश्चर्या केली व सम्मदेशिखरावर ते मोक्षाला गेले. हनुमान वगैरेहि तेथेंच मुक्त झाले.

**बिभीषणादयश्चानुदिशं ययुस्तपोबलात्।**
**सीताच्युतं गतान्ये तु यथार्हं स्वर्गमासदन् ॥८१ ॥**

बिभीषण, हनुमान, सुग्रीवादि आपआपल्या तपोबलाप्रमाणे

१ लक्ष्मणस्य अपत्य लक्ष्मणिस्तस्मिन् २ मिथिलाधिपत्ययुक्तं ३ देव्यो राजानः कुमाराश्च सह दीक्षिताः तु पुनः श्रावकीभूतौ शिवगुप्त जिनेन रामे प्रतिबोधिते गृहीतसयमौ पृथिवीचद्राजितजयौ।

अनुदिश स्वर्गाला गेले. सीता अच्युत नामक स्वर्गात गेली व इतरहि आपापल्या कर्मानुसार स्वर्गाला गेले.

इति श्रीमुनिसुव्रततीर्थंकरहरिषेणचक्रिरामलक्ष्मण रावणचरितोत्तरंविंशम् ॥ २० ॥

---

देशेऽभूदत्र कौशम्ब्यां सिद्धार्थः श्रावकोत्तमः ।
श्रुत्वा स्वतातसंन्यासं महाबलजिनादसौ ॥ १ ॥
संन्यस्य बध्द्वा नामान्त्यं भुक्त्वा शर्मापराजिते ।
मिथिलेशस्य भूत्वाहं विजयाख्यस्य तुग्महीम् ॥ २

जम्बूद्वीपात, भरतक्षेत्रात, वत्सदेशातील कौशाबी नगरात राजा पार्थिव व राणी सुदर्शा पोटीं सिद्धार्थ नामक राजा होता. तो उत्तम श्रावक होता. पार्थिवाने महाबलजिनाजवळ दीक्षा घेतली. व तो समाधिमरण साधून मरण पावला हें ऐकून सिद्धार्थ राजाने मुनिवर नामक अवधिज्ञानी साधूजवळ दीक्षा घेतली व एकादशांगाचे अध्ययन व षोडश भावनाचें चिंतवन करून तीर्थंकरनामकर्म बांधले. आणि तो अपराजित नामक उत्तम अनुत्तरविमानात अहमिंद्र झाला. वंगदेशातील मिथिलानगरींत राजा विजय व राणी वप्पिला याच्या पोटीं नमिनाथ तीर्थंकर होऊन तो अहमिंद्र जन्मला.

भुक्त्वा मेघागमे रन्तुं गजारूढो वनं व्रजन् ।
नत्वा सौधर्मदेवाभ्यां नभःस्थाभ्यामितीरितः ॥३॥

१ भरते २ राजा ३ वंगदेशे ४ अहं शब्दस्य अहमिन्द्र एव ५ वप्पिला गर्भे ६ जन्मनो द्वितीयदिने समवसरण गताभ्यां ।

त्यांनीं बरीच वर्षें राज्यवैभव भोगले. एकदा वर्षाऋतूच प्रारंभी हत्तीवरून ते वनश्री पाहण्यास गेले असता, सौधर्म स्वर्गांतील दोन देव आले व वंदन करून ह्मणाले,

**आवाभ्यां वत्सकावत्यामिहार्हदपराजितात् ।**
**श्रुत्वाद्य भावितीर्थेशं देवं त्वां द्रष्टुमागतौ ॥ ४ ॥**

जंबुद्वीपाच्या पूर्वविदेह क्षेत्रांतील वत्सकावती देशांत सुसीमा नगरींत अपराजित विमानातून अपराजित नामक तीर्थकर उत्पन्न झाले आहेत. त्यांच्या दर्शनास सर्व देव गेले होते. तेथे असे ऐकले की, अपराजित स्वर्गातूनच मिथिला नगरींत जन्मलेले नमिनाथ भावी तीर्थंकर आहेत. ह्मणून आम्ही आपल्या वंदनास आलो.

**तच्छ्रुत्वा त्यक्तराज्योऽसौ तपसा प्राप केवलम् ।**
**तीर्थं प्रवर्तयामास नमिमेनं नमाम्यहम् ॥ ५ ॥**

ते ऐकून शहरात परत आल्यावर त्यांनीं वैराग्ययुक्त होऊन राज्य सोडले व दीक्षा घेऊन तपश्चरण केले. आणि ज्यानीं धर्मतीर्थ प्रवर्तित केलें त्या नमिनाथ तीर्थंकराना मी नमस्कार करतो.

**द्वीपेऽत्रैरावते जातः श्रीपुरेशो वसुन्धरः ।**
**पद्मावतीप्रियामृत्योर्वरवर्मजिनान्तिके ॥ ६ ॥**

जंबुद्वीपाच्या उत्तरेस महाऐरावत क्षेत्रातील श्रीपुरचा राजा वसुंधर व राणी पद्मावती याना विनयंधर नामक पुत्र होता. पद्मावती

१ जबूद्वीपे स्थिताया २ देववचनं ।

राणी वारल्यामुळे राजा फार कष्टी झाला व त्यानें वरधर्म नामक सर्वज्ञदेवाजवळ दीक्षा घेऊन वरीच तपश्चर्या केली.

स संयम्य महाशुक्रं गतः कौशाम्ब्यधीशिनः ।
विजयस्य सुतो जातो जयसेनो रथाङ्गधृत् ॥ ७ ॥

शेवटीं समाधीमरण साधून तो महाशुक्रनामक विमानातील देव झाला. तेथून तो वत्सविजय देशातील कौशाम्बी नगरीचा राजा विजय व राणी प्रभाकरी याच्या पोटीं जयसेन चक्रवर्ती होऊन जन्मला.

सौधाग्रस्थ·सशब्दोल्कापातं तप्त्वा तपो जिनात् ।
वरदत्ताज्जयन्तेऽभूद्देवःप्रायोपवेशनः ॥ ८ ॥

पुष्कळ वर्षे राज्यवैभव भोगल्यावर एकदा तो गच्चीवर बसला असता मेघ गडगडाटासह उल्कापात झाला. तेव्हा त्याला वैराग्य प्राप्त होऊन वरदत्तनामक केवलीभगवानाजवळ त्याने दीक्षा घेतली आणि वरीच तपश्चर्या करून समाधिमरण साधल्यानतर तो जयत नामक अनुत्तर विमानात अमृत पिणारा अहमिंद्र झाला.

इति श्रीनमिनाथजयसेनचक्रिचरितावसानमेकविंशम्

---

विन्ध्येऽत्र मगधे जातो भिल्लो भार्यास्य वागुरा
विमलामलबुद्ध्याख्यौ चारणौ मारयंस्तदा ॥ १ ॥
भक्तोऽनयो राजगृहे श्रेष्ठी वृषभदत्तक ।
तयेत्युक्त्वा निषिद्धोऽसौ जातौ तौ श्रावकावुभौ ॥२

१ वरी २ दीक्ष ३ अमृतभोजी ।

जंबुद्वीपांत, भरतक्षेत्रांत मगधदेशांत, विंध्यपर्वतावर एक भिल्ल रहात होता. त्याच्या बायकोचे नांव वागुरा होते. विमलबुद्धि व अमलबुद्धि नामक दोन चारण मुनींनां त्या भिल्लानें ठार करण्याचा विचार केला पण या चारणमुनीचा वृषभदत्त नामक एक भक्त राजगृहनगरींत आहे असे वागुरेने त्याला सांगितले व मुनिवधापासून तिने परावृत्त केलें. उपदेशामुळे ते भिल्लदांपत्य पश्चात्ताप पावून श्रावक बनले.

**वल्मीके तुम्बकफलं गृण्हन्दष्टोऽहिनान्यदा ।**
**निदानेन मृतः सोऽभूत्तस्यैव श्रेष्ठिनोऽङ्गजः ॥ ३ ॥**

सापाच्या वारुळातील तुंबक फल घेत असताना त्या भिल्लाला साप चावला व तो मेला. मरताना शुभनिदान बांधल्यामुळे तो त्याच श्रेष्ठीच्या पोटीं जन्मला.

**इभ्यकेतुःस कनकप्रभां तन्नृपजां भजन् ।**
**तेद्वृतो दत्ततद्राज्यं नाकुक्षिप्तकरा शुचा ॥ ४ ॥**

त्याचे नाव इभ्यकेतु. राजगृहीच्या जितशत्रु राजाने आपली मुलगी कनकप्रभा त्याला दिली. पुढे राजानें दीक्षा घेऊन राज्यहि त्याला दिलें. वागुरेचा पती मेल्यामुळे ती कष्टी झाली व साप चावून मेली.

१ जितशत्रुनाम्नो राजगृह नृपस्य पुत्री परिणीतः २ तया स्वयंवरीकृत्य वृतः ३ जितशत्रुराजेन प्रव्रजत मगधाधिपत्य दत्त भजन् ४ नां कुर्वत्मीकं ५ भर्तृवियोगशोकेन वागुरा ।

वागुराथाहिना दष्ट्वा मृत्वा तत्सचिवोऽभवत् ।
त्रयोऽपि तपसा जातास्ते सौधर्मे सुरोत्तमाः ॥ ५ ॥

वागुरा मेल्यावर इभ्यकेतुची सचिव म्हणून जन्मली. हे दोघे व श्रेष्ठी मेल्यानंतर सौधर्म स्वर्गांत देव झाले.

पुष्करार्धापरे प्रत्यग्गान्धिलायां ततोऽभवत् ।
खगाद्युदक्तटे सूर्यप्रभेट् सूर्यप्रभात्मजाः ॥ ६ ॥

पुष्करार्धद्वीपात, पश्चिमविदेहक्षेत्रात, गांधिलदेशातील सूर्यप्रभ नगराचा राजा सूर्यप्रभ व राणी धारणी याना तीन पुत्र झाले.

चिन्तामनश्चपलगत्याख्या वेगपणे जिताम् ।
तप श्रितां प्रीतिमतीमनु तेऽथ तपोऽभजन् ॥ ७ ॥

चिंतागति, मनोगति व चपलगति असे ते तीन पुत्र होत. त्याच गांधिल देशातील अरिंदम नगरीचा राजा अरिंजय व राणी अजितसेना याना प्रीतिमती नावाची मुलगी झाली. ती मेरूपर्वताला प्रदक्षिणा घालण्याच्या शर्यतीत चिंतागती तिच्याहून श्रेष्ठ ठरला म्हणून त्याला वरमाळा घालण्यास तयार झाली. पण त्यानें ती आपल्या लहान भावाना घालण्यास सांगितले. त्यामुळें तिला खेद होऊन तिनें निवृत्तानामक अर्जिकेजवळ दीक्षा घेतली. तेव्हा

१ इभ्यकेतुमंत्री २ मंदिरस्थविराचार्यात्पूर्वभव श्रुत्वा गृहीतेन तपसा ३ सूर्यप्रभनगरस्य राजा सूर्यप्रभस्तस्य राज्ञी धारिणी तस्या । इभ्यकेतुकनकप्रभामात्रिचरा क्रमेण चिंतागतिमनोगतिचपलगतयो जाताः ५ प्रतिज्ञाया सर्वेषु विद्याधरेषु जितेषु चिंतागतिनैव ता जिता दृष्ट्वा त. निमित्तीकृत्य ।

वरील तीन्ही भावानींहि दमवर नामक मुनीजवळ दीक्षा घेऊन तप आचरिले.

**सामानिकास्तु माहेन्द्रे चिन्तागतिपुरस्सराः ।**
**द्वीपेऽत्रगन्धिलासिंहपुरेऽजातोऽपराजितः ॥ ८ ॥**

तेथून ते चौथ्या स्वर्गात सामानिक देव झाले. पुढे मनोगति व चपलगति, जंबुद्वीपांत, पूर्वविदेहक्षेत्रात पुष्कलावती देशातील गगनवल्लभ नगरीचा राजा गगनचंद्र व राणी गगनसुंदरी याच्या पोटी अमितगति व अमिततेज नावाने जन्मले. चितामतिहि सिंहपुरचा राजा अपराजित नांवे करून जन्मला.

**श्रुत्वान्यदा[३] समं पित्रा[४] सिद्धं विमलवाहनम् ।**
**तां तदर्चां[५] वीक्ष्य भोक्ष्यामित्याग्रं संश्रितो नृपः ॥९॥**

त्याच्या बापाचे नाव अर्हद्दास व आईचे नाव जिनदत्ता. एकदां मनोहर नामक उद्यानात विमलवाहन तीर्थंकर आले असतां त्यांचा बोध ऐकून त्याने दीक्षा घेतली. पुढे बरीच तपश्चर्या करून तीर्थंकरासह तो मोक्षाला गेला. त्यामुळे अपराजित फार कष्टी झाला व पुन्हां मला दर्शन दिल्याशिवाय मी अन्न ग्रहण करणार नाही असे व्रत घेऊन तो बसला. आठ दिवस उपोषण घडल्यावर यक्षपतीनें त्यांची कृत्रिम रूपे दाखवून त्याला दर्शन दिले. त्याने त्याचें पूजन करून उपवास सोडला.

---

१ यूयं वय च जाताः २ भवान् ३ फाल्गुननंदीश्वरपर्वणि ४ अर्हद्दासेन सह ५ तयोरर्हद्दासविमलवाहनयोर्मूर्तिम् ।

तदा शक्राज्ञया यक्षपतिर्विमलवाहनम् ।
तस्य सन्दर्शयामास साक्षात्कृत्वा महाशुभः ॥ १० ॥
नन्दीश्वराह्निकं कृत्वा धर्मं स्वान्तःपुरं ब्रुवन् ।
चैत्यालयेऽनुजसुरौ खगीभूतौ तपःश्रितौ ॥ ११ ॥

नंदीश्वरपूजन त्याने केले. इतक्यात त्याला चैत्यालयांत दोन चारण मुनी दिसले. ते अमितमति व अमिततेज होते. त्यांनीं दीक्षा घेतली होती.

चारणावागतौ दृष्ट्वामितादिगतितेजसौ ।
प्रार्च्य दृष्टौ युवां क्वापीत्युक्तवानादिमो गणी ॥१२॥

त्या अमितमति व अमिततेज चारणमुनींना पाहून व पुजून अपराजित ह्मणाला की, तुम्हाला मी कोठे तरी पाहिले आहे. तेव्हा अमितमति चरणमुनि ह्मणाले.

प्रागुक्तं मासमात्रायुरथ संश्राविर्तोऽर्हतः ।
इष्ट्वा द्वाविंशतिदिनकृतप्रायोपवेशनः ॥ १३ ॥

राजा, तुझे आयुष्य आता एक महिना उरल आहे. आह्मी पूर्वजन्मीचे तुझे भाऊच आहोत व वडिलाच्या सन्यासमरणानंतर आह्मी दीक्षा घेतली. ते ऐकून अपराजिताने आठ दिवस जिनेश्वर पूजन केले. व बावीस दिवस प्रायोपवेशन करून समाधिमरण साधले.

जातोऽच्युतेन्द्रोऽथ नृप सुप्रतिष्ठोऽत्र हास्तिने ।
यशोधरपिदानाप्तपञ्चाश्चर्य श्रितस्तपः ॥ १४ ॥

१ मनोगतिचपलगतिनिचरौ । २ स्वयप्रभाख्यकृद्भट्टारकेण कथित ३ भवान्मासमानायुः ४ ज्ञापिताः ५ अष्ट दिनानि जिनान्पूजयित्वा ।

तेथून तो राजा सोळाव्या स्वर्गांत पुष्पोत्तर विमानांत अच्युतेद्र झाला. पुढे तो कुरुजांगल देशातील हस्तिनापुरचा राजा श्रीचंद व राणी श्रीमती यानां सुप्रतिष्ठित नावाने पुत्र झाला. त्यानें यशोधरमुनीना आहारदान दिल्यामुळे त्याला पंचाश्चर्याची प्राप्ति झाली.

**सुमन्दिराज्जिनादुल्कापाते ख्यातोन्त्यनामयुक् ।**
**मृत्वा समाधिना चाभूज्जयन्ते लवसत्तमः ॥ १५ ॥**

पुष्कळ राज्यवैभव भोगल्यावर एकदा तो गच्चीवर बसला असतां उल्कापात पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झाले व त्याने सुमंदर नामक तीर्थकराजवळ दीक्षा घेऊन एकादशाग वाचले व षोडश-भावनाचे चिंतवन केले. त्यामुळे तीर्थंकरनामकर्म बांधून तो समाधिमरण साधल्यावर जयंत नामक अनुत्तरविमानात अहमिंद्र झाला.

**हरिवंशेऽन्धककृष्णेर्माकण्डेयान्वयेऽग्रतुर्क् ।**
**समुद्रविजयःसूर्यपुरेऽनेमिःसतें तसुतः ॥ १६ ॥**

भरतक्षेत्रांत हरिवर्षदेशातील भोगपूरचा राजा प्रभंजन व राणी मृकंडू याना सिंहकेत नावाचा पुत्र झाला. त्याचे लग्न विद्युन्मालेशी झाले. त्यांच्या वंशात हरिगिरी, हेमगिरी, वसुगिरी वगैरे राजे होऊन गेले. कुशार्थ देशाच्या शौर्यपुरचे राजा सूरसेनाला शूरवीर नामक मुलगा होता. त्याच्या भार्येचे नांव धारिणी. हिच्या-

१ सति २ प्रसिद्धः ३ देवोत्तमः ४ दशाना पुत्राणा आद्यो दशार्हः ५ शिवादे व्यामभूत्.

पासून त्याला अवकवृष्णि व नरवृष्णि असे दोन पुत्र झाले. अवक-वृष्णीला सुभद्राराणीपासून दहा मुलगे व दोन मुली झाल्या. पहिला मुलगा समुद्रविजय. त्याला शिवादेवीपासून अपराजिताचा जीव अहमिंद्र, नेमिनाथ तीर्थंकर झाला.

द्वारवत्यामभूत्पाणिग्रहे बुद्धो मृगेक्षणात् ।
तं प्रव्रज्याप्तकैवल्यं कृततीर्थं नुमःशिवम् ॥ १७ ॥

द्वारवती नगरींत राजमतीच्या पाणिग्रहणाचे वेळीं मांसाहाराच्या मेजवानीकरितां आणलेले हरिण पाहून नेमिनाथाना वैराग्य उत्पन्न झाले. व त्यानीं दीक्षा घेऊन आणि कठोर तप करून धर्मतीर्थ प्रवर्तित केले. नंतर जे मोक्षाला गेले त्या कल्याणकारक नेमिनाथ तीर्थंकराना आह्मी नमस्कार करतो.

भिल्लेभ्यकेतुसौधर्मदेवचिन्तागतीष्टमाहेन्द्र[१] ।
अपराजितोऽथाच्युतेंद्रःसुप्रतिष्ठो जयन्तजो नेमि ॥१८॥

भिल्ल, इभ्यकेतु, सौधर्मदेव, चिन्तागति विद्याधर, चौथ्या स्वर्गांतीलदेव, अपराजित, सोळाव्या स्वर्गातील अच्युतेंद्र, सुप्रतिष्ठित व जयंत विमानातील अहमिंद्र इतक्या भवावलींतून नेमिनाथ झाले.

शैले[२] छायेक्षणाद्भ्राभ्यां नीतो भार्यांपिता तपः ।
सगङ्खःसर्वनिर्नामा स्वयम्भूदर्शनात्कृत[३] ॥ १९ ॥

कुरुदेशातील पलाशकूट गावांत सोमशर्मा नामक एक ब्राह्मण

---

१ माहेंद्रेग इभ्यः २ नंदिनामा द्विज. ३ विमलतीर्थे स्वयभू नाम्नो वासुदेवस्य दर्शनात् कृतनिदानः ।

होता. त्याच्या मुलाचे नाव नंदी. त्याला मामाची मुलगी लग्नासाठी न मिळाल्यामुळे व त्याच्या अशक्ततेबद्दल लोकात टीका झाल्यामुळे वैतागून त्याने आत्महत्या करण्याचा निश्चय केला. शैलपर्वतावर आत्महत्येसाठी तो गेला पण त्याची छाती होईना. तेथे निर्नामक व शंख अशा दोन शिष्यासह द्रुमषेण नामक मुनिराज विहार करून आले होते. शंखाने नंदीला योग्य बोध करून दीक्षा घेवविली. पुढील दुसऱ्या जन्मात नंदीचा जीव शंख व निर्नामकाचा बाप होणार असे त्यांनी द्रुमषेण मुनिवरापासून ऐकले.

निदानस्तपसा प्राप्तो महाशुक्रं ततो बलः ।
पद्मःशंखचरः सूर्यपुरेऽभूद्वसुदेवतः ॥ २० ॥

शंखाने शुभनिदान बांधले व निर्नाम्याने अशुभनिदान बांधले. नंदीसह हे दोघे तपश्चर्येनंतर समाधिमरण साधून महाशुक्र विमानातील देव झाले. नंदीचा जीव स्वर्गातून च्यवून वसुदेव झाला. सौरीपुरात वसुदेवापासून देवकीला निर्नाम्याचा जीव कृष्णचक्रवर्ती म्हणून झाला व त्यालाच रोहिणीपासून शंखाचा जीव बलभद्र नामे करून झाला.

रोहिण्यां कृष्णो देवक्यां मथुरायां हरिर्विभो ।
तद्विड्डासीज्जरासन्धो ब्रह्मदत्तोऽथ चक्रभृत् ॥ २१ ॥

कृष्ण व बलराम याचा शत्रु जरासंध अर्थात् तो प्रतिनारायण होता. नऊ नारायणानंतर ब्रह्मदत्त नामक चक्रवर्ति होऊन गेला.

## ॥ अथ कथासंग्रहः ॥

**मा भोजयतु कोपीमेमिति वारितमाथुरं ।**
**उग्रसेनोव शिष्टेर्षि मासानशनपारणे ॥ १ ॥**

गंगा व गंधवती नद्यांच्या संगमावर एक तापसाचा आश्रम होता. गुणभद्र व वीरभद्र नामक दोन चारणमुनि तेथून चालले असता त्यांनी तपस्व्यांना उपदेश करण्याचा प्रयत्न केला. जटा राखल्याने केसांत कृमि होऊन हिंसेला कारण होते. तसेच पंचाग्नी साधनानेहि हिंसा होते वगैरे त्यांचा उपदेश वसिष्ठ नामक तपस्व्याला पटला व त्याने लगेच दीक्षा घेतली. तो एकेक महिन्याच्या उपवासाची तपश्चर्या करू लागला. मुनीला आहारदानाचे पुण्य आपणालाच लाभावे ह्मणून मथुराधिपति उग्रसेनाने गावांतील लोकांना अशी ताकीद दिली की कोणीहि मुनींना आहार देऊ नये. एक महिन्याच्या उपवासाचे पारणे करण्यासाठी वसिष्टमुनि मथुरेंत आले.

**भोजयिष्ये गिरवींभन्द्रजरासन्धेशशासनैः ।**
**त्रिविघ्नित स्वयंनास्मै दत्ते भिक्षामसौ परान् ॥ २ ॥**

त्यावेळी राजवाड्याला आग लागल्यामुळे मुनींना आहाराशिवाय परतावे लागले. दुसऱ्या महिन्याची तपस्या पूर्ण झाल्यावर पुन्हा आहारासाठी ते आले असतां मस्त हत्ती मोकाट सुटल्यामुळे

अह भोजयिष्य २ मथुरालोकः २ गंगागंधवतीसंगमे जठरकौशिका ख्यनानतपस्विनायको वसिष्टतापसः ।

सर्वत्र गडबड माजली होती. तेव्हांहि ते तसेच परत गेले. तिसऱ्या महिन्याच्या तपस्येनंतर पारण्यासाठीं ते आले असतांहि उग्रसेन जरासंधाने आज्ञापिलेल्या एका कामात फार गढून गेला होता. आपण स्वतः आहार देत नाहीं व लोकानाहि देऊं देत नाहीं अशी टीका होऊं लागली.

**निषिध्यतीति लोकोक्तैस्तृतीये मास्यलब्धभुक्।**
**क्रुद्ध्वा मृतो निदानेन सोऽभूत्कंसो नृपात्मजः ॥३॥**

मुनीने ती टीका ऐकली व तीन महिन्यांचा उपवासी असल्या-मुळें भुकेने तो मेला. मरता मरता त्याने क्रोधाने असे निदान केले कीं, मी या राज्याच्या पोटीं येऊन त्याचा वध करीन. त्या मुनीचाच जीव पद्मावती पासून कंस नामे करून उग्रसेन राजाला झाला.

**दुर्दोहृदो दुराकारो ज्ञातक्रौर्यः प्रवाहितः।**
**कालिन्द्यां कंसमञ्जूषाक्षिप्तो सौऽशौण्डभार्यया ॥४॥**

पद्मावतीच्या पोटात गर्भ रूपाने तो मुनि आल्यावर उग्रसे-नाचे मांस खाण्याचे डोहाळे तिला होऊ लागले. जन्मल्यावरहि तो फार विचित्र दिसत होता. म्हणून त्या मुलाला राजाने पेटीत घालून कालिंदी नदींत सोडले. ती पेटी कलालाच्या भार्येला मंदोदरीला मिळाली.

---

१ उग्रसेनपुत्रः २ भर्तृहृदयमांस खादामीति दुष्टदोहृदकारक ३ ओष्ठ-दशननिष्ठुरा लोक नभृकुटीकरणादि ४ मंदोदर्या।

कौशाम्ब्यामुद्धृतो जातः कुमारोऽन्यतुजो रुजेन् ।
निर्वासित पत्तिवृत्या वसुदेवमसेवत ॥ ५ ॥

कौशाम्बी नगरात मंदोदरीनें त्याचे पालन पोषण केलें. पण तो लोकांच्या मुलांना हाणमार करी म्हणून त्याला तिनें घराबाहेर घातले. तो शूरीपूरला गेला व तेथे वसुदेवाचा नोकर बनला.

जरासन्धेन राज्यार्द्धेतरां जीवद्यशोभिधाम् ।
दातुं भेतां जितवतेजय्यं सिंहरथं रिपुम् ॥ ६ ॥

पोदनपुरचा राजा सिंहरथाला जो कोणी जिवत धरून आणून देईल त्याला अर्धे राज्य व कलिंदसेनेपासून मला झालेली जीवयशा नामक मुलगी मी देईन असे जरासंधाने जाहीर केले.

प्रार्दित्सोर्वसुदेवेन दित्स्यतांदुष्टलक्षणाम् ।
जितो मत्पत्तिनानेन स कंसेनेति बोधितं ॥ ७ ॥

वसुदेवाने पराक्रम गाजवून सिंहरथाला पकडले व जरासंधाच्या स्वाधीन त्याला केले. तेव्हा त्याने अर्धे राज्य व जीवयशा त्याला देऊ केली. त्या मुलीची व्यवस्थित्रा तिची लक्षणे पाहून कंस नामक या माझ्या नोकराने सिंहरथाला धरून आणले आहे म्हणून त्यालाच ती मुलगी द्या असे वसुदेव म्हणाला.

तेनेमन्दोदरीमातृमञ्जूषापत्रवाचनात् ।
ज्ञातंगाय दत्तरथ स राज्यार्द्धां सुतामदात् ॥ ८ ॥

१ परपुत्रान २ चेटवृत्तिद्वारा । ३ राज्यार्द्धेन कृत्वा अन्यगातिचाया ४ प्रतिज्ञाना ५ दिग्जयारम्भेप आत्मना जेतुमशक्य ६ पादनेश ७ जरासन्ध कन्या दातुमिच्छा सिंहरथ समर्पयामास ८ [illegible] राजा तस्येतिबोधित. वद इत्यर्थः ९ जरासंधेन ।

कंसाच्या कुलाची चौकशी करण्यांत आली तेव्हां मंदोरीनें पेटी पत्रासह हजर केली. त्यामुळे कुलाचा उलगडा होऊन अगदीं खुषीने जरासंधाने आपली मुलगी व अर्धे राज्य कंसाला दिलें.

**गृहीत्वा मथुरां बध्वा प्रक्षेपोद्रिक्त वैरतः ।**
**पितरौ गोपुरे न्यस्य कृत्वा सूर्यपुरात्प्रभुम् ॥ ९ ॥**

मला जन्मतःच माता पित्यानी यमुनेत सोडलें ह्मणून रागारागाने कंस तसाच मथुरेला गेला. ती आपल्या ताब्यांत घेतली व त्याने मातापितराना वेशीवर टांगले. टांगून तो वसुदेवाला बरोबर घेऊन गेला.

**वसुदेवं देवसनीं देवकीमनुजां निजाम् ।**
**स्वीकार्य भृत्यामा मुदास्ताशामना ददौ ॥ १० ॥**

देवसेन राजाची मुलगी देवकी, आपली चुलत बहीण वसुदेवाला त्याने दिली व विवाहविधीने तिचा स्वीकार वसुदेवानें केला.

**अतिमुक्तमुनिर्जातु भिक्षार्थं गृहमागतः ।**
**देवकी तेऽनुजा साधो! पुष्पजानेन वाससा॥ ११ ॥**

एकदा अतिमुक्त मुनि भिक्षेसाठीं आले असता जीवंयशा त्या मुनीला ह्मणाली, ही पहा तुमची बहीण कामभोगवस्त्रानें तुमच्याकडे अभिलाषाने पहात आहे.

---

१ यमुनाया बालक्षेपाधिक्य २ विवाह विधिना ग्राहयित्वा ।

स्नेहां व्यनक्त्यनेनेति तत्पत्न्यां नर्मणोदितः।
तामूचेऽस्याः सुतो रण्डांत्वां कर्तेति निशम्य तत् १२

तिने अशी आपली चेष्टा केलेली ऐकून मुनीनीं शाप दिला कीं, हिचा मुलगा तुला विधवा करील.

तत्र छिन्ने तथैतेन कर्ताप्यपितृकामिति।
तच्छ्रुत्वामर्दिते पद्भ्यांतत्रेतेन महीमिमाम्॥ १३ ॥

तेव्हा तिने रागावून त्या भोगवस्त्राचे तुकडे तुकडे केलें. तेव्हा मुनीनीं पुन्हा शाप दिला कीं तुझ्या बापालाहि मारून तो तुला अनाथ करील. मग तिनें ते तुकडेहि पायाखालीं तुडविले तेव्हा मुनि ह्मणाले की, तो देवकीपुत्र तुझ्या भ्रताचेहि राज्य घेऊन चक्रवर्ती होईल.

भोक्ता त्रिखण्डामिति तच्छ्रुत्वाकंसेन तन्मुखात्।
देवक्या स्वगृहे सूतिं याचितोऽमंस्त तत्पतिः॥१४ ॥

तो त्रिखंडपृथ्वीचा शास्ता होईल हें मुनिवचन कळल्यावर कंसानें देवकी माहेरींच बाळंत होऊ दे असें वसुदेवास कळविले व त्यानें तें मान्य केले.

देवकीवसुदेवाभ्यां भोजयित्वान्यदा मुनिः।
दीक्षां नौ स्यान्न वेत्युक्त सोऽवोचत्सप्त वां सुता ॥१५॥

---

[१] आमन्त्रेय २ कंस भार्यया ३ देवक्याः ४ तस्मिन्वस्त्रे ५ मुनिवचनं श्रुत्वा ६ जीवयशा. ७ वसुदेवः ८ आवयोः ९ युवयोः।

पुढें एकदा वसुदेव देवकीनें अतिमुक्त मुनींना आहारदान करून आह्मीहि दीक्षा घेऊं कीं नाहीं ह्मणून विचारलें. तेव्हां त्यांनीं उत्तर दिले की तुह्माला सात पुत्र होतील.

भवितारः यमास्तेऽत्र त्रयोऽन्यत्रातिवर्धिताः।
सेत्स्यन्ति पश्चिमश्चार्धचक्री भावीति भाववित ॥१६॥

पहिलीं सहा तीनदां जुळी होतील व ती दुसरीकडेच वाढतील शेवटला मात्र अर्धचक्री होईल असे भाकित त्या भविष्यवेत्या मुनीनीं सांगितले.

अलकाभद्रिलश्रेष्ठीत्रियमैर्नैगमर्षिणा।
सद्योजातमृतेरिन्द्रादेशेन परिवर्तनात्॥ १७॥

भद्रिल नगरातील वैश्यपुत्री अलका त्याचवेळी बाळंत होत जाईल. इंद्राच्या प्रेरणेनें नेगमर्षिदेव त्या जुळयाची आदलाबदल करील.

त्रीन्स्वस्त्रीयैर्यमान्कंसः शिलायां सोऽवधीत्क्रमात्।
सप्तमे मास्यतोऽज्ञातःकृष्णोऽथ स्वगृहेऽजनि ॥१८॥

तीन खेपेच्या सहा पुत्राना कंसाने शीलेवर आपटून ठार मारले. चौथ्या खेपेस ती माहेरी बाळंत न होता घरीं झाली. कंसाला पत्ता न लागावा असा बंदोबस्त करण्यात आला.

पोष्टुं नन्दगृहे कृष्णं हरन्सीरीधरन्पिता।
छत्रं गोभूताप्तदेवीशृङ्गोद्यन्मणिदीपिका ॥ १९॥

१ युगलाः २ चित्तज्ञो मुनिः ३ नाम्ना देवेन ४ देवकया अग्रे अलका सुतान्मृतान्मुक्त्वा देवकीपुत्रान् जवीतोलकाग्रे स्थापनात्। ५ भगिनीपुत्रान् ६ द्वौ द्वौ पुत्रौ जातौ सद्यः शिलापदेनाघातयन् ७ वृषभाकारेण प्राप्त।

बलराम आणि वसुदेवानें कृष्णाला नंद गवळ्याच्या घरीं जतन करण्यास पाठवावे असे ठरविलें. रातोरात मुलाला त्यांनीं पोहोचतें केलें. वसुदेवाने त्याचेंवर छत्र धरलें होतें. बलदेवानें त्याला हातात धरलें होतें नगरदेवतेनें गायीचें रूप घेऊन मणिमय शिंगानीं उजेड पाडला होता.

यान्तौ निशीथे तत्पादस्पर्शोद्घाटितगोपुरौ ।
संभ्रान्तोक्ततदर्थोग्रसेनाशीर्वादमोदितौ ॥ २० ॥

मथुरेच्या वेशी मुलाच्या पादस्पर्शाने एकदम उघडल्या. उग्रसेनाला त्याच वेशीवर टांगलें होतें. त्याला रात्री दरवाजे उघडलेले पाहून आश्चर्य वाटलें. त्याला सर्व हकीकत कळल्यावर त्यानें त्याला आशीर्वाद दिला.

यमुनादत्तपन्थानौ सद्योजातात्मजार्पणम् ।
नन्दहस्तेऽभ्ययान्तं पृष्ट्वाज्ञाततदर्थ कौ ॥ २१ ॥

यमुनेनें दुभंग होऊन त्याना वाट करून दिली. नुकतीच जन्मलेली कन्या घेऊन नंद येत असलेला त्याना वाटेत भेटला. देवतेनें मला ही कन्या आज रातोरात आपणाकडे पोहोचविण्यास दिली आहे असे त्यानें सांगितल्यावर त्याना आशय कळला.

ततः दत्वा स्वडिम्भं तं डिम्भां लात्वागतौ गृहम् ।
तद्दत्य कंसस्तां वीक्ष्य भुग्ननासां व्यधाद्बलात् ॥२२॥

१ अर्चितोपवनगुपुरोद्घाटवशुकितोक्त २ वक्रनासा ।

ती मुलगी घेऊन व आपला मुलगा त्याच्या स्वाधीन देउन ते दोघे घरी परत आले. तेव्हा कंस आला व त्याने तिचे नाक दावून तिला नकटें केले

**सा तपं:स्था:स्थिता विन्ध्ये व्याघजग्धोऽगमद्दिवम् ।**
**हस्ताङ्गुलीत्रयी तस्या:कृत्वाँङ्गैर्विन्ध्यवासिनी ॥२३॥**

तिला गुप्त तळघरात वाढविली व मोठी झाल्यावर बाहेर काढली. आपले विकृत स्वरूप पाहून ती लाजली व सुव्रतानामक अर्जिकेजवळ दीक्षा घेऊन तिने विंध्यपर्वतावर राहून तपश्चर्या चालविली शेवटीं तिला वाघाने खाल्ले. तीन बोटें पडलेली होती. ती पाहून तेथील जगली लोकाना आश्चर्य वाटले व त्यार्नी विंध्यवाली देवी म्हणून त्या बोटाची पूजा सुरू केली.

**पृष्टो दृष्ट्वा महोत्पातात्कंसेन वरुणोऽब्रवीत् ।**
**जातस्तेऽरिरिति श्रुत्वा तं ध्यायन्यतनादिभिः ॥२४॥**

एकदा मथुरेत बरेच उत्पात झाले. तेव्हा वरुण नामक ज्योतिष्यार्नीं त्याला सांगितले की, तुझा शत्रु निर्माण झाला आहे. ते ऐकून पूतना वगैरे देवतांना त्याच्या तपासण्यासाठीं त्याने पाठविले.

**प्राक्सिद्धाभिस्तद्वेष्टफलाभिःसप्ताभिःश्रितः ।**
**सं तौंद्गिरो विभङ्गेर्न तं ज्ञात्वाथ विकृत्यं ताः ॥२५॥**

१ उद्भकायोत्सर्गेण स्थिता २ भाक्षिता ३ व्याधजनपदैर्देवतोतिभणित्वार्चिता ४ अरिंचिंतयन्कंसः ५ पूर्वजन्म ६ कसः ७ कसवचनेन ८ मिथ्यावाधिना ९ विक्रिया प्राप्ताः ।

त्यानें पूर्वीच्या जन्मीं प्रसन्न करून घेतलेल्या व या जन्मात इष्ट फळ देणाऱ्या याच देवता होत. त्या सात देवतांनीं मायारूपे धारण केलीं. विभंगज्ञानानें कृष्णाला मात्र ओळखलें.

मातृन.ककुभद्वन्द्वतालरासभिकार्वताः ।
जिघांसन्त्यस्त्वाशक्तिं कंसमूचिरे ॥ २६ ॥

या सात देवानीं माता, गाडी अर्जुन वृक्षाची जोडी, ताल-वृक्ष, गाढव, व घोडा अशी क्रमानें रूपे धारण करून कृष्णाला मारण्याचा प्रयत्न केला. पण त्यात त्या असमर्थ ठरल्या.त्यानीं कंसास येऊन तसें सांगितले.

द्रष्टुं स्वविक्रमं हन्तुं रौद्रकृष्णवृषाकृतेः ।
आयातोऽरिष्टदेवस्य जातु ग्रीवां बभञ्ज सः॥ २७ ॥

आपला पराक्रम दाखविण्यासाठीं अरिष्टदेव काळ्या बैलाचे रूप घेऊन कृष्णाला मारण्यास आला. पण कृष्णाने त्याची मान मोडून टाकली.

तच्छ्रुत्वा गोमुखीनामोपवासच्छलनाथ तम् ।
पितरौ स्मार्चतो सिञ्चद्वलश्चाम्बा क्षरत्कुचाम् ॥२८॥

देवकीवसुदेवानीं त्याच्या पराक्रमाच्या वार्ता ऐकून गोमुखीं उपवास केल्याच्या मिषानें गवळ्याचे घरीं ते आले. तेथे त्यानीं त्याची

१ यशोदारूपेण त्रिपस्तनी माता २ तं हतुमसामर्थ्यमस्माकं ३ हरि-पराक्रम ४ गृहमागमन ।

पूजा केली. तेव्हा देवकीच्या स्तनातून आपोआप दुग्धधारा पडल्या.

**गोवर्धनमहावृष्टौ छत्रीचक्रेऽयदा गवाम् ।**

**सोऽहिशय्याधनुःशंखान्पूर्वदेवगेहजान्स्वयम् ॥२९॥**

एकदां अतिवृष्टि झाली असतां कृष्णानें गोवर्धन पर्वताचीच छत्री करून गायींचे रक्षण केले. मथुरेतील प्राचीन जिनालयाजवळील ग्रामदेवतच्या मंदिरात अहिशय्या, धनुष्य व शंख ही तीन रत्ने कृष्णाला दिसली.

**दृष्ट्वा साध्यान्ददाम्येषां साधयित्रे सुतामिति ।**

**कंसे तद्घोषितेऽसौ तान्मान्वनोऽसाधयन्महान् ॥३०॥**

त्या अहिशय्येवर चढून जो कोणी धनुष्याला बाण लावील व शंख वाजवील त्याला मी माझी मुलगी देईन. तेव्हा स्वर्भानु राजाचा मुलगा भानु याच्या नावाने कृष्णाने त्या तीन्ही गोष्टी केल्या. ज्यानीं प्रत्यक्ष पाहिले होते ते ह्मणूं लागले की हें भानूचे काम नसून दुसऱ्या कुमाराचे आहे. तेव्हा कंसानें त्या कुमाराला शोधून आणण्याची आज्ञा केली.

**ततःकंसभयान्नष्टे गोष्ठे केनाप्यनुद्धतम् ।**

**तत्रोद्धृत्य हरिःशैलस्तंभं लेभे जनाशिषः ॥ ३१ ॥**

त्या आज्ञेमुळे भिऊन नंदगवळी गाव सोडून गेला. ज्यागावीं ते जाऊन राहिले तेथे एक दगडी खांब होता. तो कोणीहि उचलू शकत नव्हते. तो कृष्णाने उचलला व सर्वांची शाबासकी मिळविली.

---

१ मथुरास्थापनार्थे जिनालयाते पूर्वदिशि पुरदेवतागृहे समुत्पन्नान् ।

प्रत्यागते व्रजे भंक्त्वा महानागं पितुर्गिरा ॥
कंसं सहस्रपत्राणि ससरोजान्युपाहरत् ॥ ३२ ॥

काहीं दिवसांनीं नंदगवळी स्वग्रामीं परत आला. तेव्हा त्याला छळण्यासाठीं कालियसर्प ज्याची राखण करतो ते सहस्रकमळ आणून दे अशी आज्ञा कंसाने केली. नंदाच्या आज्ञेनें कृष्णाने नागास जिंकून तेंहि आणून दिलें.

अथाहूतो नृपेणामामल्लैर्नन्दो व्रजन्गजम् ।
भंक्तोत्खातरदाहत्य कृष्णेनोक्तजयो द्युतत् ॥३३॥

आपल्या मल्लासह एका कुस्तीसाठीं येण्यास नंदगवळ्याला कंसाने आज्ञा केली त्याप्रमाणें काहीं मल्ल व कृष्णासह तो मथुरेत प्रवेश करीत असता त्याच्यावर मदोन्मत्त हत्ती सोडण्यात आला. कृष्णाने त्याला त्याचाच दात उपटून त्या दातानेंच मारलें.

गत्वासभां नियुद्धेऽसौ तं प्रायुंक्त नृपाज्ञया ।
सोऽपि रङ्गं प्रविश्यार्द्धा चाणूरं कंसमप्यहन् ॥ ३४

मल्लाचे आखाड्यात ते गेले. चाणूराशी कृष्णाची कुस्ती जुंपली. एका क्षणात त्यानें त्याला चीत्त केले. तेव्हा स्वतः कंस द्वंद्वयुद्धास सज्ज झाला. कृष्णानें त्याला कुस्तींत ठार मारून टाकले.

स नाकिमुक्तपुष्पौघैर्विपाश्यं यापित्तरौ वरैः ।
नम्रैर्नृपैर्कृत प्रीतिःस्वैश्च सूर्यपुरं ययौ ॥ २५ ॥

१ कालियनाग २ नीतवान्कंस प्रति ३ दंतेन ४ व्यक्त झटिति वा ५ नाकिभिर्देवैः ६ बंधन छित्वा ७ स्वजातिभिः ।

सर्व देवानीं त्याच्यावर पुष्पवृष्टि केली. त्याने आपल्या माता-पिताना बंधमुक्त केले. अनेक माडलिक राजे व आपल्या नातलगां-सह तो सूर्यपुरास गेला.

**तज्जीवद्यशसःश्रुत्वा पूर्वेतान्हन्तुं यदून्सुतान्।**
**ज्ञात्वा चक्री जितान्कालयवनं प्राहिणोत्स्वजम्[3] ३६**

जीवद्यशेने जरासंधाला कसवधाची हकीगत सांगितली तेव्हां त्यानें अपराजिताला व आपल्या मुलाना भारी सेनेसह पाठविले पण पराजित झाला असे ऐकून कायलवनाला त्याने पाठविले.

**श्रुत्वायान्तमजय्यं तं गत्वाब्धौ यादवाःस्तिताः।**
**प्रदीप्याग्निं पृथु वास्थांन्मार्गे तत्कुलदेवताः॥३७॥**

कालयवन चालून येत आहे असे ऐकून सर्व यादव सूरीपुर हस्तिनापुर, मथुरा वगैरे गावे सोडून समुद्रकिनारी गेले. कालयवन -याच्या मागे लागला तेव्हां यादवाच्या कुलदेवतेने म्हातारीचें रूप घेऊन खूब दावानल पेटविला. आणि ती म्हातारी वाटेतच बसली. कालयवनाने हा काय प्रकार आहे. म्हणून विचारल्यावर तुझ्या भीतीनें माझ्या यादवपुत्रानी ग्रामत्याग करून स्वतःला जाळून घेतले आहे. त्याचा हा दावानळ आहे असे उत्तर दिले.

**वृद्धा मत्पुत्रयर्दैवःप्रविश्याग्निं भयान्मृता.**
**इत्युक्तोऽरिस्तयाहंयुर्गत्वा तातं तथावदत् ॥ ३८ ॥**

---

१ कंसवधाधिकं प्राहितान् २ पुत्र ३ वृद्धा आह मत्पुत्रा यादवाश्च अथवा हे मत्पुत्र हे कालयवन ४ विघटयति स्म।

स्त्रातारीच्या त्या बोलण्यावर विश्वास ठेवून कालयवन परतला व जरासंधाला त्यानें अभिमानानें आपल्या दराऱ्याचें वर्तमान सांगितले.

कृष्णःकृताष्टोपवासो वासायोपाब्धिनैगमम् ।
आरुह्याश्वाकृतिमेनं सिन्धुं सोऽखण्डयत्सुरेट् ॥३९॥

कृष्णाने समुद्रकाठीं आठ दिवसाचें अनशनव्रत आचरलें तेव्हा नैगमदेवाने येऊन त्याला सांगितलें कीं, घोड्याच्या आकाराचा एक देव येईल त्यावर बसून तू समुद्रात बारा योजनें जा. तुझ्यासाठीं तेथे एक नगरी बनेल. त्याप्रमाणें अश्वरूपी देव आल्यावर कृष्ण त्यावर स्वार होऊन समुद्रातून गेला. त्यामुळें समुद्र दुभगून एक बेट बनलें.

तत्र शक्राज्ञया यक्षश्चक्रे द्वारवतीं पुरीम् ।
वसतस्तत्र कृष्णादीन्नेमिकल्याणिकोर्जितान् ॥४०॥

इंद्राच्या आज्ञेवरून कुबेराने त्या बेटावर द्वारकानगरी वसविली. तेथे कृष्णादि यादव रहात असताना नेमिनाथ तीर्थंकराची गर्भ व जन्म कल्याणिक झालें.

कुरुवंशे हास्तिनेशाज्जातो व्यास पराशरात् ।
तत्पुत्रो धृतराष्ट्रोऽन्यः पाण्डुश्च विदुरोऽपरः ॥४१॥

हस्तिनापुरात कुरुवंशाचा शक्ति नामक राजा राज्य करीत होता. त्याला शतकी नामक राणीपासून पराशर नामक मुलगा

१ कुन्य नदनचरस्य देवस्य स्वामी हरिः २ सत्यवतीगर्भे ।

झाला. त्याचा मुलगा व्यास. व्यासाला सुभद्रा नामक स्त्रीपासून धृतराष्ट्र पांडु व विदुर असे तीन पुत्र झाले.

**धृतराष्ट्रो नरपतिर्वृष्णिपुत्र्यां शत सुतान् ।**
**दुर्योधनादीन्गान्धार्यां ख्यातवीर्यानजीजनत् ॥४२॥**

वृष्णि राजाची मुलगी गांधारीपासून धृतराष्ट्र राजाला दुर्योध-नादि शंभर मुलगे झाले.

**कामसुद्राधरे पाण्डौ कन्यां कुन्तीं गते रहः ॥**
**जातमुद्धृत्य कालिन्द्याः कर्णं चम्पाधिपोऽपुषत् ॥४३**

वज्रमाली नामक विद्याधर हस्तिनापुराजवळ वनक्रीडा करीत असतां आंगठी हरवली व ती पांडूला सापडली. पांडूने त्याला ती दिली. तेव्हा ही आंगठी जवळ असली ह्मणजे वाटेल तेव्हां गुप्त होता येते असे विद्याधराने त्याला सांगितले. तिचा उपयोग करून कुंतीनामक कुमारीशीं पांडु अदृश्यपणे संभोग करून आला. मुलगा जन्मल्यावर त्याच्या कानात कुंडल घालून पेटींत पत्रासह ठेऊन ती यमुना नदींत सोडून देण्यात आली. चंपापुरचा राजा आदित्य यास ती पेटी सांपडली. त्या बाळकाचे पालनपोषण केले.

**युधिष्ठिरादीन्सोऽनूढ्वा तामेवान्धकवृष्णिजाम् ।**
**त्रीन्कुन्त्यां मद्र्यां नकुलःसहदेवस्तुजोऽसृजत् ॥ ४४ ॥**

---

१ व्यासस्य पुत्राः सुभद्रागर्भजाः. २ गांधारीनाम्न्या ३ उग्रसेन-देवसेनमहासेनानुजाया । ४ उपभुक्तवति ५ कुंडलरत्नकवचलेखपत्र युक्तं मंजूषाया क्षिप्तं कुंतीपरिजनैः ६ राधाकर्णग्रहणादादित्येन चंपाधिपेन कृत्त कर्णं सञ्ज चापुषत् राधाख्यायै स्वपत्न्यै दत्वाऽपुषत् ७ पुत्रानेव पंच असृजत् अजीजनत् ।

पुढे पंडु राजाचा विवाह त्याच अन्धकवृष्णीच्या कुंतीनामक मुलीबरोबर झाला. व तिच्यापासून त्याला युधिष्ठिर, अर्जुन व भीम असे तीन आणि कुंतीपासून नकुल व सहदेव झाले.

दुर्योधनादयो व्याजं जरासंधमथाभजन् ।
युधिष्ठिरादयः कृष्णं विपक्षक्षपणोद्यतम् ॥ ४५ ॥

दुर्योधनादिकांनीं कपटी जरासन्धाचा पक्ष घेतला व युधिष्ठिरादिकांनीं शत्रूचा नाश करण्यास उद्युक्त झालेल्या कृष्णाचा पक्ष घेतला.

मागधैःसन्मणीन्राजगृहे वीक्ष्योपदीकृतान् ।
ते चक्रिणेते क्व प्राप्ता इति पृष्टा जगुःप्रभोः ॥ ४६ ॥

मगधदेशांतील कांहीं वैश्य समुद्रमार्गानें व्यापार करीत असतां द्वारकेस आले व तेथील वैभव पाहून चकित झाले. तेथें त्यांनीं रत्नमाणिकांची खरेदी केली व स्वदेशीं परत गेले. जरासन्धराजाला तीं रत्नें त्या व्यापाऱ्यांनीं दाखविलीं व हीं कोणत्या देशांतील आहेत असें त्यानें विचारलें असतां ते म्हणाले.

मध्येऽब्धिद्वारवत्यास्ते दिव्या यदुसभर्तृका ।
तत्रो वायुवशात्प्राप्तैर्दृष्टास्माभिरयोजिता ॥ ४७ ॥

आम्ही नेहमींच्या मार्गानें प्रवास करीत असतां वाऱ्यानें भलतीकडे नेले गेलो. तेव्हां आम्ही द्वारावती पाहूं लागलो. हें पेठ राजा

१ मगधदेशज सांयात्रिकैः. २ यदुना हरिणा सम्भर्तृका सनाथा ।
३ अग्नौ ।

कृष्णाने सनाथ केले आहे. ते फार भरभराटींत आहे तेथून आम्ही हीं रत्नें आणली.

श्रुत्वैतत्प्रभृशं क्रुद्धो युष्मान्प्रत्याह दुर्मदान्।
इति नारदाचारोक्त्या ज्ञात्वा यांतं निषूदितुम् ॥ ४८

यादवांचे नांव ऐकल्याबरोबर जरासन्ध चिडला व ते वैभवशाली वर्णन ऐकून तर त्यांचा नाश करण्यासाठी एकदम निघाला. नारदांनीं तो चालून येत असल्याचे वर्तमान कृष्णाला सांगितले. माझ्या जावयाला मारून पळून जाऊन लपून बसलेले असून वैभवाचा डौल मिरविणारे मस्तवाल हे यादव आहेत असे जरासंध ह्मणाल्याचेहि नारदाने कृष्णाला सांगितले.

यामोऽरिं त्वं पुरीमेतां रक्षेति स्ववचःस्मृतेः।
ॐ मित्युक्तवतःस्मित्वा नेमेर्ज्ञात्वा जयं [illegible]मतात् ४९

या नगरीवर शत्रु चालून येत आहे. तू तिचे रक्षण कर असे श्रीकृष्ण नेमिनाथाना ह्मणाले तेव्हा ते ओम् ह्मणून हसले. त्यावरून आपणाला जय मिळणार असे त्याना वाटले

कुरुक्षेत्रं गतःक्षिनं स्वर्बलैरपरैररिम्।
हत्वा तन्मुक्तचक्रेण जितारिराविशत्पुरीम् ॥ ५० ॥

आपले व मित्रराजांचे सैन्य एकत्रित करून कृष्ण कुरुक्षेत्राला गेला. तेथे घनघोर युद्ध झाले. जरासंधाने सोडलेल्या चक्रानेच

१ मजगातर त्वा परलाच्यात्मगोपने स्थितत्वान्मिथ्यागर्विणः चर्की इत्यादि. २ हतु ३ स्वसन्ताने भातु ४ पाडवादिसैन्यैः ५ जरासंधमुक्तचक्रेण

त्याला कृष्णाने मारले. याप्रमाणे जय-मिळवून त्याने नगरींत प्रवेश केला.

चक्रशक्तिगदाशङ्खधनुर्दण्डासयो हरेः
रुक्मिण्याद्यष्टदेव्यष्टिस्त्रीसहस्राणि षोडश ॥ ५१ ॥

चक्र, शक्ति, गदा, शंख, धनुष्य, दंड, तलवार वगैरे श्रीकृष्णाची दिव्य अस्त्रे होती. रुक्मिणी त्याची पट्टराणी असून त्याला सोळाहजार स्त्रिया होत्या.

रत्नमालागदासीरमुशलान्यथ सस्मिताः ।
देव्यश्चासन्बलस्याष्टौ मिथः प्रीतौ सुखं स्थितौ ॥५२

रत्नमाला, गदा, नांगर, मुसळ, ही बलदेवाचीं आयुधें होतीं त्याला आठ हजार स्त्रिया होत्या ते सुखाने एकमेकावर प्रेम करीत काळ घालवीत होते.

जातुचिद्धान्ते जलक्रीडामनोहरसरोवरे ।
सङ्क्रान्तैर्यादवैश्चक्रे तत्राभून्नेमिभामयोः ॥ ५३ ॥

एकदा सर्व यादव मनोहर सरोवरात जलक्रीडा करण्यास गेले. तेथे नेमिनाथ व सत्यभामा याचा मनोहर संवाद झाला.

सलापः सेचनादन्ते लाहीदं क्षालयेति वाक् ।
सत्यभामां प्रतिस्नानवस्त्रं नेमि स्वमाक्षिपत् ॥ ५४ ॥

---

१ अष्ट महादेव्य इत्या पूजित्वा वा २ बलभद्रस्याष्टौ सहस्राणि ३ अन्तकाले ४ नामितत् ५ जलक्रीडावसाने ६ उक्त्वा ।

जलक्रीडेनंतर थट्टेने त्यांनीही ' ल्हाद ' ह्मणजे हे वस्त्र घे आणि धू ह्मणून सत्यभामेपुढे ते टाकले.

किं नागशय्यामाक्रम्योरु शाङ्र्गाब्जप्रपूरणम् ।
त्वया कार्यं यदेनं मामादिशस्येतदीरितः ॥ ५५ ॥

तुह्मी कृष्ण थोडेच आहात की ज्याने अहिशय्येवरून शाङ्ग धनुष्याला बाण लावला व शंखध्वनि केला. तुमचे स्नानवस्त्र मी काय ह्मणून धुवावे ? असे सत्यभामेने मर्मोद्गार काढले.

ततस्तमायुधागारं गत्वासौ तदसाधयत् ।
तान्निकश्रुततद्वृत्तस्तस्योऽबियँ स्मरोदयम् ॥ ५६ ॥

तेव्हा नेमिनाथ आयुधशाळेत गेले व तेथे असलेल्या अहिशय्येवर चढून त्यांनी शाङ्र्ग धनुष्याला बाण लावला व शंखध्वनि केला. तो ध्वनि कुसुमचित्रामहालात बसलेल्या कृष्णाला ऐकू गेला. तेव्हा त्यानाहि आश्चर्य वाटले की नेमिनाथास स्मरोदय कसा झाला?

अभ्याग्रवंश्यं प्राथ्योंग्रसेनं राजमतिं सुताम् ।
वेद्यामारोपयत्कृष्णस्तयोर्मूर्ध्न्यार्द्रतण्डुलान् ॥ ५७ ॥

उग्रवंशाच्या राजा उग्रसेनकडे जाऊन कृष्णाने त्याची राजमति नामक मुलगी मागून आणून नेमिनाथाबरोबर तिला वेदीवर उभी करून कृष्णाने मंगलाक्षता टाकल्या.

१ धनुश्चटापन शंखप्रपूरण २ किं करणीयं त्वया नेमिना ३ वाच कथयसि. ४ वाक्यं ईरितः प्रोक्तं ५ सत्यभामो कर्मत्रयं ६ तत्रायुधागारे नियुक्तः ७ निमृश्य ८ तद्गृह गत्वा ।

पाण्यप्संकक्षणेऽन्येद्युःस्वराज्ये नाशशङ्कया ।
मृगानारुध्य वृत्त्या ता शिक्षायित्वा स रक्षकान् ॥५८

पाणिग्रहणाचे वेळीं दुसरे दिवशीं कृष्णाला अशी शंका आली कीं, नेमिनाथ आपल्या राज्याचे वाटेकरी होतील. ह्मणून शिकाऱ्याकडून पुष्कळ पशु मेजवानीच्या मांसासाठीं त्याने आणविले. ही हिंसा पाहून नेमिनाथ सन्यास घेतील अशी त्याला खात्री होती. पशु कशाला आणले ह्मणून त्यानीं विचारल्यास मारून त्याच्या मांसाची लग्नानिमि । मेजवानी देण्यासाठीं ते आणले आहेत असे स्पष्ट उत्तर देण्यास कृष्णानें रक्षकाना शिकवून ठेविलें.

त्वद्विवाहे व्ययीकर्तुं कृष्णेनेते इति ।
तैः प्रत्यालापयन्नेमिं यातमालोकितुं दिशः ॥ ५९ ॥

दिशावलोकनासाठीं नेमिनाथ पालखींत बसून चालले असता त हरिण पाहून त्यानीं विचारले व कृष्णाने शिकविल्याप्रमाणें रक्षकानीं उत्तर दिलें.

ज्ञात्वा तच्छद्म निर्विद्य संस्मृत्य स्वपुराभवान् ।
शोकार्तामंबिकां कृत्वा स राजमतिराजकः ॥ ६० ॥

कृष्णाचे कपट नेमिनाथानीं ओळखलें व वैराग्य पावून स्वतःचा पूर्व जन्माचे स्मरण केले. दुःखी मातेला उपदेश करून राजी-

१ हस्तोदकसेचनसमये २ उत्तरमकारयत् ३ गतं सत ४ राजिमत्या नान्दरोण च सहित ।

माति रडत आहे असें पाहून तिलाहि बरोबर घेतलें व हजारो राज-पुत्रासह दीक्षा घेतली.

सहस्राम्रवने श्रित्वा तपः षट् पञ्चवासरान् ।
नीत्वोर्जयन्ते कैवल्यं प्राप्य मोहं विहत्य सः ॥६१॥

ते सहस्राम्रवनात जाऊन राहिले व पासष्ट दिवस त्यानीं अनशन व्रत आचरलें. पारणे केल्यावर त्यांना कैवल्यज्ञान झालें. यानीं मोहाचा नाश केला.

प्राप्तो रैवतकोद्यानं कृष्णं तत्त्वमबूबुधत् ।
देवकीसत्यभामाद्या गणीडिष्टां कथां निजाम् ॥६२॥

रैवतकउद्यानात येऊन त्यांनीं कृष्णाला तत्वोपदेश केला. देवकी, सत्यभामा वगैरे स्त्रियांनीहि येऊन गणधराना त्यानीं आपापली भवावली विचारली.

प्रद्युम्नादि भवान्पृष्ट्वा ज्ञात्वा पृष्टो हरे कियत् ।
राज्यं भावीतितत्प्रेम्लो सीरिणा नेमिरब्रवीत् ॥६३॥

प्रद्युम्नाची भवावली विचारून ऐकल्यावर हरीच्या प्रेमानें बलदेवाने नेमिनाथाना प्रश्न विचारला कीं हें हरीचें राज्यवैभव किती दिवस टिकेल. तेव्हा ते ह्मणाले.

द्वीपायनस्तपो लात्वा प्रेष्यै प्रत्येत्यधक्ष्यति ।
द्वारकां द्वादशाब्दान्ते मत्तयादवकोपितः ॥ ६४ ॥

१ गणीशा आविता २ हरिस्नेहेन ३ ,देशांतर गत्वा पश्चादागत्य।

बारावर्षानंतर मद्यपानानें मदोन्मत्त झालेल्या यादवाकडून राज्य नष्ट होईल. द्वीपायन तप आचरून यादवामुळे क्रोधित होऊन द्वारकानगरी जाळून टाकील.

हरिं जरत्कुमारोऽपि कौशाम्बीगहनान्तरे ।
सुप्तं तृषार्तं वनैण भ्रान्त्या सद्यो हनिष्यति ॥६५॥

कौशाम्बी जवळील गाढ काननात कृष्ण तान्हेने व्याकुळ होऊन निजला असता जंगली हरिण समजून जरत्कुमार तात्काळ त्याला ठार मारील.

एतच्छ्रुत्वाप्तनिर्वेदा विद्वांसः स्वाम्यनुज्ञया ।
प्रद्युम्नरुक्मिणीमुख्या मोक्षीं दीक्षामशिश्रयन्॥६६

वरील भविष्य ऐकून शहाण्याना वैराग्य उत्पन्न झाले व प्रद्युम्नादि मुले व रुक्मिणी वगैरे स्त्रियानीं मोक्षपददायी दीक्षा स्वामीच्या ह्मणजे कृष्णाच्या आज्ञेनें घेतली.

सम्भवश्चानिरुद्धश्च तन्नाशं वीक्ष्य दीक्षितौ ।
प्रद्युम्नश्चाथ निर्वाणा गिरनारित्रकूटगा. ॥ ६७ ॥

द्वारकेचा नाश होणार हे पाहून संभव व अनिरुद्धानेंहि दीक्षा घेतली व प्रद्युम्नासह ते गिरनार पर्वतावर मोक्षाला गेले.

रुक्मिण्याद्याःसुसेत्स्यन्ति द्योऽच्युतास्तपसाऽच्युतः ।
धर्मातोऽत्रैत्य माहेन्द्राद्बलस्तीर्थं करिष्यति ॥ ६८ ॥

---

७ द्वारावतीदाहारिक ।

रुक्मिणी वगैरे स्त्रिया अच्युत नामक स्वर्गांतून येऊन, नंतर मोक्षाला जातील. बलदेव माहेंद्र स्वर्गातून येऊन व कृष्ण प्रथम नरकांतून येऊन तप करून येथे तीर्थ बनवितील अर्थात् तीर्थंकर होतील.

**नेमिः पुनर्विहृत्योर्वी पल्लवं देशमास्थितः ।**
**अथ भारतसंक्षेपो लाक्षावेश्मप्रवेशिता ॥ ६९ ॥**

नेमिनाथ पुढें विहार करीत पल्लव देशांत गेले. भारत संक्षेपाने असे आहे. पांडव लाक्षागृहात कुरुकडून वैरामुळें टाकले गेले.

**कुरुभिःसहजारित्वान्निर्गत्यातःसुरंगया ।**
**साप॒दानन्तु द्रौपैद्याः कम्पिल्यायां स्वयंवरम् ॥७०॥**

पण कपट ओळखून सुरंगाच्या रस्त्याने पांडव लाक्षागृहातून निसटले व अद्भुत कर्मे करून त्यांनी कपिला नगरींत प्रवेश केला.

**प्रविष्टाः पाण्डवास्तत्र विद्धराधो युवौनृपः ।**
**ततः पार्थात्सुभद्रायामभिमन्युरसौत्सुतः ॥ ७१ ॥**

तेथे त्यांनी स्वयंवरमंडपात प्रवेश केला व अर्जुनाने राधावेध ( मत्स्यभेद ) करून द्रौपदी मिळविली. पुढे सुभद्राहरण अर्जुनानें केले व तिच्या पासून त्याला अभिमन्यु नामक मुलगा झाला.

**द्रौपद्यामिगणुमानाश्च सूनवोऽन्वभवन्क्रमात् ।**
**देशानिमान्क्षितिर्गुप्तं भ्रान्त्वा दर्शितविक्रमाः ॥७२॥**

१ दुर्योधनाद्यैः २ हास्तिनागपुरस्थितेन विदुरेण कुद्दालकराप्रन्प्रस्थाप्य नगराद्वहिर्लाक्षागृहनिर्मापण व्याजेन निर्मापितया सुरंगया ३ अद्भुतकर्मणासह: प्रविष्टा ४ द्रुपदस्य दृढरथायाः पुत्र्याः ५ अर्जुनः ६ प्रसूते स्म ७ पंच प्रमाणा ८ भूमौ प्रच्छन्नं यथाभवति तथा ।

अर्जुनापासून द्रौपदीलाहि क्रमानें पाच मुलगे झाले. सर्व देश अज्ञातवासात हिंडून पाच पाडवानीं पराक्रम प्रगट केला.

द्यूतं रन्त्वा धर्मपुत्रो दुर्योधनमहीभुजा ।
जित्वा कुरून्कुरुक्षेत्रे श्रित्वापाग्मधुरामगुं ॥ ७३ ॥

दुर्योधन राजा बरोबर धर्मराजा द्यूत खेळला व हरला ह्मणून तो अज्ञातवास प्राप्त झाला होता. पण त्यानतर कौरवाना जिंकून त्यानीं दक्षिणमथुरेंत वास केला. त्यानी पुष्कळ देशातून भ्रमण केलें.

श्रुत्वा द्वारवतीदाहाद्याप्य निर्वेदमर्हतं ।
ज्ञातजन्मान्तरास्ते निर्ग्रन्थाः शत्रुञ्जये स्थिताः ॥७४ ॥

द्वारका भस्मसात् झालेली ऐकून त्याना वैराग्य प्राप्त झाले व नेमिनाथाकडून आपली भवावली ऐकून ते निर्ग्रंथ मुनि झाले व शत्रुजयावर गेले.

द्विट्स्वस्त्रियाँहतास्तप्तलोहभूषा वितेपिरे ।
कौन्तेयास्तेप्यगुः सिद्धि माद्रेयौ त्वंतिमां दिवम् ७५

तेथें ते तपश्चर्या करीत असता दुर्योधनाचा भाचा आला व त्याने तापलेल्या लोखडाची राजभूषणें त्याच्यावर घातली तरी त्यानीं ध्यानावस्था सोडली नाहीं. त्यामुळें कुतीचे तीन पुत्र सिद्ध-पदाला गेले व माद्रीचे दोन पुत्र अनुत्तर पाचव्या सर्वार्थसिद्धि नामक स्वर्गातील विमानात देव झाले.

---

१ दक्षिण मथुरा २ प्रतपति स्मके पाडवाः किं कृत्वा देशान्भ्रान्त्वा. ३ नेमेः समीपात् ४ आतापनयोगेन स्थिताः ५ दुर्योधनभागिनेय कुर्युवराख्य.

**कुंन्तीसुभद्राद्रौपद्योनिर्वास्यंत्यच्युताच्च्युताः ।**
**प्राग्बद्धनरकायुष्कः कृष्णोऽनुमात्तशुद्धदृक् ॥ ७६ ॥**

अच्युत स्वर्गांतून आलेले कुंती, सुभद्रा, द्रौपदी वगैरे स्त्रियांचे जीव मोक्षाला जातील. नरकातील आयुकर्म बांधलेला कृष्णाचा जीव भावापासून म्हणजे नेमिनाथाजवळून शुद्ध सम्यक्दृष्टि प्राप्त करून घेता झाला व तीर्थंकर नामकर्माचा बंध करून प्रथम नरकांत जन्मला.

**भ्रातुराप्तान्त्यनामागाच्छ्वभ्रं तच्छत्रुरप्यघात् ।**
**नेमौ सिद्धेऽथ साकेते चूलायां ब्रह्मणो नृपात् ॥९८**

त्याचा शत्रु जरासंध सुद्धां मरून तेथेंच गेला. नेमिनाथ सिद्ध-पदाला गेले. नंतर अयोध्येत ब्रह्मराजा व चूलाराणीचा मुलगा ब्रह्मदत्त चक्रवर्ती झाला.

**स्वर्गादेत्य सुरःकश्चित्ब्रह्मदत्तःसुतोऽभवत् ।**
**स भूत्वात्रांतिमश्चक्री प्राविक्षत्सप्तमीं क्षितिम् ॥९९**

तो स्वर्गातून येऊन चक्रवर्ती बनला होता व मेल्यानंतर सातव्या नरकात गेला.

**सुभानुःप्राग्जश्चित्रांगदःखेटोऽर्ये तुर्यभूः ।**
**शङ्खो महाशुक्रसुरः सीरी माहेंद्रजो जिनेट् ॥ १००**

सुभानु पहिल्या स्वर्गातील देव, चित्रांगद विद्याधर, चौथ्या

---

१ नेमेरुपदेशात्प्राप्तसम्यक्त्वः २ जरासंधः ३ सौधर्मजो देवः ४ स्वर्गचतुर्थमाहेंद्रदेवः ।

स्वर्गातील देव, शंखश्रेष्ठी, महाशुक्र विमानातील देव इतकी भवाघली फिरून बलदेव झाला. आता तो महेंद्रस्वर्गात आहे. पुढे तीर्थंकर होईल

**अमृतरसायनपलपचतृतीय नरकोद्भवश्चात्र ।**
**यक्षोभूर्निनामा महादिशुक्रोऽच्युतोऽथ धार्मोर्हन् १०१**

अमृतरसायन स्वयपाकी, तिसऱ्या नरकातील जीव, यक्ष नावाचा मनुष्य, निर्नामा, महाशुक्र विमानातलि देव अशी भवावली भोगून कृष्णाचा जीव नरकात गेला व पुढे तो तीर्थंकर होईल.

**॥ इति श्रीनेमिनाथपद्मकृष्णजरासन्धब्रह्मदत्तचक्री चरितोत्तरं द्वाविंशम् ॥२२॥**

---

**पोदनेऽत्रारविन्दस्य राज्ञो मन्त्री वराद्विज. ।**
**मरुभूतिरभूद्राज्ञा सहप्राप्तागमश्चिरात् ॥ १ ॥**

या जबुद्वीपात दक्षिणभरतक्षेत्रात पोदनपुरच्या अरविंद नामक राजाचा मरुभूति नामक ब्राह्मण मंत्री होता. राजासह त्यानेंहि आगमाचे ज्ञान मिळविलें होतें. फार पूर्वीपासून तो त्याचा मंत्री होता.

**रक्तं वरुणयां ज्येष्ठे स्वभ्रातृकमठे स्त्रिया**
**वसुन्धरीं भवत्कान्तां त्वद्भ्राता भजतीति स. ॥ २ ॥**

---

१ जबूभरते २ श्रुतिस्मृतिशास्त्रविदित्यर्थः राजापि प्राप्तागमः ३ दीर्घकालपर्यंत ४ कमठभार्या ५ कथित ।

त्याल. कमठ नामक भाऊ होता. त्याच्या स्त्रीचे नांव वरुणा व मरुभूतीच्या भार्येचे नांव वसुंधरी होते. कमठाचे प्रेम वसुंधरीवर होतें व तिच्याशी तो रममाण होऊं लागला. तुझा भाऊ तुझ्या भार्येला भोगतो असे वरुणेने मरुभूतीला सांगितले.

**तामाश्वास्यान्यदा छन्नो दृष्ट्वा तच्चेष्टितं स्वयम् ।**
**विज्ञाप्येशं विगोप्यासौ तं शठं निरवासयत् ॥ ३ ॥**

तिला योग्य अश्वासन देऊन मरुभूतीने स्वतः लपून बसून त्यांच्या प्रेम चेष्टा पाहिल्या व राजाला सांगून कमठाला हद्दपार करविले.

**गत्वोपसिंधु पञ्चाग्नितपः कुर्वन्स मोहतः ।**
**तेनान्यदा स्वनृपेशोदाच्याश्रित्य प्रणामिना ॥ ४ ॥**

सिंधू जवळील तापसपल्लींत शिवतपस्व्याजवळ जाऊन कमठाने पंचाग्नि साधन केले. मरुभूतीने पुन्हा राजाला विचारून कमठाचा आश्रय घेतला. त्याची तो भक्ती करीत असे.

**प्रसाद्यमानस्तं क्रोधाज्जघान शीलया ततः ।**
**मलये कुब्जकाख्याने स जातः सल्लकीवने ॥ ५ ॥**

एकदा मरुभूति त्याचे पुढे नमून प्रार्थना करीत असता पूर्व-वैर स्मरून, क्रोधाविष्ट होऊन कमठाने त्याला दगडानें ठेचून मा-

प्रच्छन्नो मरुभूतिः २ खरारोहणोच्छिष्टशरावमालागलारोपणादिकं कारयित्वा ३ निर्घाटितः ४ नदीतीरे तापसपल्ल्या शिवतापससमीपे ५ अज्ञानात् ६ मरुभूतिना ७ निजनृपस्य कथयित्वा ८ तं कमठ आश्रित्य ९ प्रणामोस्यास्तीति प्रणामी तेन प्रणामिना प्रणतवता १० मरुभूतिं ।

रले. तेव्हा मेल्यावर तो मलयपर्वतावरील कुब्जक नामक सल्लकी व-
नात हत्ती झाला.

वज्रघोषो गजेन्द्रोऽस्य वशासीद्वरुणा प्रिया ।
सार्थेनामारविन्दश्च यान्तं सम्मेदमर्हत ॥ ६ ॥

त्याचें नाव वज्रघोष होतें. वरुणा मेल्यावर पूर्वप्रेमामुळे हत्तीण
बनून त्याच्याजवळ राहिली. श्रावक संघाबरोबर सम्मेदशिखराला
यात्रेस जाता जाता अरविंदराजानें मुनि झाल्यावर त्याच वनात
मुक्काम केला होता.

वन्दितुं तत्सरस्तीरे प्रतिमायोगमास्थितम् ।
सार्थं भंक्त्वा हन्तुकामो वत्से श्रीवत्सलाञ्छनम्॥७॥

त्या वनातील तळ्याजवळ मुनि झालेला अरविंद राजा प्रति-
मायोग धारण करून ध्यानस्थ बसला असता वज्रघोष हत्ती. संघ
विध्वस्त करून त्याला मारण्यासाठी आला. तेव्हा त्याला मुनीचे
छातीवरील श्रीवत्सलाञ्छन दिसले.

तस्य दृष्ट्वांजसा जातिस्मरो स्नेहोद्बभूव सः ।
तेन प्रबोधितो धर्मे श्रावकव्रतमग्रहीत् ॥ ८ ॥

ते चिन्ह पाहून त्याला पूर्वजन्माचे स्मरण झाले व राजभक्ती-
मुळे त्याला मारण्याचे विसरून त्याच्यापुढें सोंड नमवून तो बसला.
ध्यान उतरल्यावर अरविंदमुनीनें त्याला श्रावकव्रते दिलीं.

---

१ हस्तिनी २ सल्लकीवनस्थ ३ वक्षसि ४ स्वामिस्नेहेन ।

तदाप्रभ्यत्यघाद्धिभ्यद्भग्नाः शाखाःपरैर्द्विपैः ।
शुष्काणि तृणपत्राणि खादन्विध्वंस्तमम्बु च ॥९॥

तेव्हापासून पापभयाने तो हत्ती जलक्रीडा करीना व वनहि उध्वस्त करीत नसे. इतर हत्तींनी पाडलेला पाला पाचोळा व अचित्त पाणी तो पिऊन श्रावकव्रत पाळीत असे.

पारणायां पिबन्क्षीणः पातुं वेगवतीं चिरात् ।
पङ्कमग्नः समुद्धर्तुं यतमानोऽप्यशक्नुवन् ॥ १० ॥

एकदा अनशन व्रत आचरल्यावर पारणें करण्यासाठी तो वेगवती नदीतीरीं आला व चिखलात रुतला. फार अशक्त झाला असल्यामुळे बाहेर निघण्यासाठीं खूप धडपड केली तरीहि तो निघूं शकला नाही.

मृतो दष्ट कुक्कुटाहीभूतेन कमठेन च ।
सहस्रारे सुखं भुक्त्वा स त्रिलोकोत्तमे पुरेस् ॥११॥

कमठाचा जीव मरून कुक्कुट सर्प झाला होता. त्यानें पूर्व वैर स्मरून हत्तीला दंश केला. त्यामुळे तो मरून सहस्रार स्वर्गातील देव बनला.

जातोऽत्र पुष्कलावत्यामग्निवेगःखगोऽन्यदा ।
सं तपस्यन्हरिगिरेर्गुहायां केवलीकृत ॥ १२ ॥

स्वर्गातून तो जबूद्वीपात विदेहक्षेत्रात, पुष्कलावती देशांत,

१ उपलास्फालनाक्षपगजघट्टनात्प्रासुकीभूंत २ अग्निवेग ३ के मस्तके वलीकृतः वेष्टितः गिलित इत्यर्थ ।

विजयार्धपर्वतावरील त्रिलोकोत्तमपुरात विद्याधराचा राजा विद्युद्गति व राणी विद्युन्माला याच्या पोटीं अग्निवेग नामें करून जन्मला. त्यानें खूब सुखोपभोग भोगल्यावर दीक्षा घेतली. हरी नामक पर्वतातील गुहेत तो तपस्या करीत असता त्याच्या डोक्याला अजगरानें वेटाळें घातले. अर्थात् गिळिले.

धूमप्रभाद्जगरीभूतेन द्विषता गतः ।
पुष्करे भुक्तशर्मास्मादेत्यास्मिन्पद्मवर्षगे ॥ १३ ॥

कुक्कुट नाग मरून धूमप्रभा नामक नरकात पडला. तेथून तो अजगराचे जन्मास गेला. त्याच अजगरानें पूर्ववैर स्मरून अग्निवेग मुनीला आवळून ठार मारलें. तेथून तो जीव अच्युत स्वर्गांतील पुष्कर विमानात देव झाला. पुढे तो पश्चिम विदेह क्षेत्रात पद्म नामक देशातील अश्वपुरचा राजा वज्रवीर्य व राणी विजया याच्या पोटीं वज्रनाभि नावानें जन्मला.

चक्री जनित्वाश्वपुरे वज्रनाभिस्तपोऽभजत् ।
षष्ठ्यश्भ्रात्कुरङ्गाख्यो भिल्लो भूत्वाथकर्कशम् ॥ १४ ॥

या वज्रनाभि चक्रवर्तीने बरेच वैभव भोगून खूब तप आचारिले. कमठाचा जीव अजगर मेल्यावर साहव्या नरकात गेला व तेथून तो कुरग नावाचा भिल्ल होऊन जन्मला. तो फार क्रूर होता.

---

१ धूम प्रभः अकरातोऽत्र २ जबूद्वीपापरविदेहपद्माख्ये दशे ३ भूत्वा ४ भूरि यथा भवति घोरोपसर्गान्कृत्वा इत्यर्थं ।

इतस्तेन सुभद्राख्ये[1] ग्रैवेयकपञ्चमे।
भुक्त्वाच्युतोऽभूदानन्द ऐक्ष्वाकुःकोशलेश्वरः ॥१५॥

वज्रनाभि मुनि समाधिमरण साधून सुभद्र नामक मध्यम ग्रैवेयक विमानांतील अहमिंद्र देव झाला. तेथून तो जंबुद्वीपांत कोशलदेशांतील अयोध्या नगरीचा इक्ष्वाकुवंशाचा राजा वज्रबाहु व राणी प्रभाकरी यांच्या पोटी आनंद नामें करून जन्मला.

कुर्वन्नष्टाह्निके चैत्ये[2] स स्वामिहितमन्त्रिणः।
वाचाभ्यर्च्य जिनेंद्रार्चाःपप्रच्छ द्रष्टुमागतम् ॥१६॥

एकदा त्याने नंदीश्वर पर्वात चैत्यालयात अष्टान्हिक महोत्सव स्वामिहित नामक मंत्र्याच्या सल्ल्यानुसार केला. तेव्हा तेथे दर्शनासाठी आलेल्या मुनींना त्यांने विचारले.

नत्वा विपुलमत्याख्यं गणेशं[4] भगवन्फलम् ॥
अचेतना[5] जिनेंद्रार्चाः[3]र्चतां किं भवेदिति ॥ १७ ॥

विपुलमति मुनींना नमस्कार करून तो ह्मणाला, जिनेंद्रांच्य अचेतन अशा मूर्तींचे पूजन केले असता पूजकाना काय बरे फल मिळते ?

सोऽवोचदाचिदप्यर्हन्न सोत्पादजगतां[6] ध्रुवम् ॥
न वस्तुतत्परीणामप्रकर्षैः पुण्यपुञ्जकृत् ॥ १८ ॥

---

१ मध्यग्रैवेयकात्रितयमध्यविमाने २ जिनगृहे ३ पूजयता भव्याना ४ गणेशः ५ चेतनारहिताऽपि ६ सह उत्पादेन वर्तंते जगंति तेषां सोत्पादजगता वस्तुपदार्थः परिणामप्रकर्षै कृता पुण्यपुंजकृत् किं न भवति अपि तु भवति॥

तच्छ्रुत्वा शुद्धवृत्तेन विश्वार्हद्विंबवर्णनम् ॥
प्रागर्यम्णि प्रतीयार्कविम्बस्थजिनमन्दिरम् ॥ १९ ॥

ते ह्मणाले कीं अर्हद्विंब जरी अचेतन असलें तरी उत्पन्न होणाऱ्या पदार्थावर परिणामाचा प्रकर्ष केला तर ते पदार्थ पुण्य पुद्गलाचा स्कंध बनविल्याशिवाय कसा राहील ? जिन बिंबातील पुण्य पुद्गलाचा समुदाय भव्य जीवाना शुभ परिणाम उत्पन्न करण्यास निमित्त होतो. जिनबिंबामुळे जिनमंदिरहि पवित्र ठरतें वगैरे उपदेश ऐकून त्या राजानें सूर्यविमानात असलेल्या जिन-मंदिराची भावपूजा केली.

हैमं सान्तर्जिनगृहं कारयित्वार्कमण्डलम् ।
चक्रे महेज्याः सूर्यार्घालोकं विभुजिनालयम् ॥२०॥

त्याने राजवाड्यामध्ये रत्नखचित सुवर्णाचें जिनालय बांधून यातील सूर्यविमानस्थ जिनबिंबाची महापूजा केली. या महापूजा ह्मणजे चतुर्मुख पूजा, रथावर्तपूजा, सर्वतोभद्र पूजा वगैरे होत सूर्याला अर्घ्य दिल्यावर ज्यात जिनबिंबदर्शन केले जाते ती सूर्या-र्घालोक पूजा त्याने केली.

प्रत्यन्वहं ददे लोकं जिनेज्यायां युनक्ति च ।
तदाप्रभृति लोकेऽस्मिन्जातमर्कोपसेवनम् ॥२१॥

तो राजा दररोज सूर्यार्घालोक पूजा करतो ते पाहून सर्व

---

१ सूर्यविमाने प्रतीत्य २ राजमंदिरमध्ये ३ चतुर्मुखरथावर्तसर्वतोभद्राद्याः ४ सूर्यार्घेण आलोकः अवलोकन यत्र ।

प्रजाजन सूर्याला अर्घ्य देऊं लागले व तेव्हापासून सूर्योपासना रूढ झाली.

समुद्रदत्तात्तवृत्तः पलितात्सान्त्यनामभृत् ।
शयुःश्वभ्रादेत्य सिंहीभूतेनानतमध्ययत् ॥२२॥

वरीच वर्षे राज्यवैभव भोगीत असता डोईचा शुभ्र केस पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झाले व समुद्रदत्त मुनीजवळ त्याने दीक्षा घेऊन षोडशभावनांचें चिंतन केले व तीर्थंकर नामकर्म बांधले. कमठाचा जीव नरकातून सिंहयोनीत जन्मला होता. पूर्ववैर स्मरून त्याने ध्यानमग्न असतां राजाला उपसर्ग केला व मरून तो आनत स्वर्गातील प्राणत विमानात देव झाला.

ततोऽत्यैत्य सकाशीशविश्वसेनतुजोऽभवत् ।
षोडशाब्दवयाः प्राप्तो वनं श्वभ्रादुपेत्य तम् ॥२३॥

तेथून तो जीव काशीचा राजा विश्वसेन व ब्राह्मीदेवी यांच्या पोटीं पार्श्वनाथ नावाने जन्मला. सोळाव्या वर्षी एकदां तो वनात गेला. कमठाचा जीव नरकातून निघून प्रभूच्या मातेचा बाप महीपाल राजा होऊन जन्माला आला.

महिपालाख्यात्ममाता महीभृत प्रियास्मृत
दीक्षितं दारु भिन्दन्तमाप्तं तीव्रायितु जगौ ॥ २४ ॥

१ गुरोः २ अजगरः ३ अधीष्ट स्म आनर्तेदोऽभूदित्यर्थः सिंहेन कृत्वा ४ आनतात् ५ ब्राह्मीदेव्या ६ कमठचरं ७ प्राप्त स्वय दृष्टं ८ पुनः प्रदीपितुं अग्निं ।

सो नत्वो भोस्तपस्विन्मा साद्विन्द्वमिदं भिदः ।
ततो तीव्रक्रुधा तेन निन्ये तत्रासिपत्रगो ॥ २५ ॥

महीपाल वायकोच्या मरणामुळे दुःखी होऊन मिथ्या तपस्वी झाला. त्याच वनात धुमा पेटवुन पचाग्नि साधन करीत बसला होता. धुर्मीतील एका लाकडात सर्पयुगल होते हे ओळखून पार्श्व-नाथानीं असले हिंसात्मक तप करून काय फायदा असे विचारले? हा प्रश्न प्रभूनीं नमस्कार न करताच विचारला होता. त्या लाकडात सर्प युगल आहे आणि ते जळल्यामुळे तप कसे घडणार यामुळे तपस्वी रागावला त्यातून तो कमठाचा जीव. पूर्व वैर स्मरून अधिकच क्रुद्ध झाला व त्याने ते लाकूड कुऱ्हाडीनें फोडले,

छिन्नावक्षुतां नागेन्द्रौ तद्वाचाक्षररंजितौ ।
पद्मावतीधरणकौ सुभौमस्तंव्यमस्त सः ॥ २६ ॥

त्यातून दोन तुकडे झालेले नागयुगल बाहेर पडले. सुभौम कुमाराने तपस्व्याची खूब निर्भर्त्सना केली. त्याने पंच नमस्काराचा उपदेश दिल्याने नागयुगल धरणींद्र व पद्मावती झाले.

त्रिंशद्वर्षात्यये ऽयोध्यापतिदूतान्निशम्य सः ।
अयोध्यां पुरुतं स्तुत्वाद्राग्भावनात्तसंयमः ॥ २७ ॥

---

१ नमस्कारकृत्वा २ दारुणि ३ परशुना छिन्नो इत्यर्थ ४ इंद्रकुमारापरनाम ५ धिक्कारपूर्व अज्ञानाति मानक्रोधप्रधानोऽसि त्वामित्यबोधयत् ६ जयसेननृप ७ श्रीवृषभनाथादिदारभ्य अयोध्यावर्णन श्रुत्वा ८ पश्च जयसेनस्तुतो दूतन ।

पार्श्वनाथांच्या तिसाव्या वर्षी अयोध्याधिपति जयसेनाने घोडे वगैरे भेट दूता बरोबर पाठविली असतां अयोध्येंत झालेल्या ऋषभादितीर्थंकरांचे वर्णनहि त्याने केले. ते ऐकून पार्श्वनाथकुमारांनी दीक्षा घेतली.

विहृत्य चतुरो मासान्ध्यायन्नश्ववने स्थितः ।
संवरज्योतिषामर्त्यभूतेन खगमनक्षते ॥ २८ ॥

चार महिने विहार करून ते दीक्षावनात ध्यानस्थ असतां संवर नामक ज्योतिष्पदेवाने आपल्या विमानाला अडथळा होऊं लागला म्हणून तक्रार केली.

दीप्तवैराग्निनासौ रिरूपसर्गैरुपद्रुतः ।
द्विर्पो धरणपद्मास्तव्यापत्तिःप्राप्तकेवलः ॥ २९ ॥

पूर्ववैर आठवून त्याने पार्श्वनाथांना खूब जलवृष्टि करून उपसर्ग केले. कारण तो देव कमठाचाच जीव होता. पूर्वजन्मी आपले जीव वाचविल्याचे उपकार स्मरून धरणेंद्र व पद्मावती या नागदेवतांनी त्यांच्यावर नागफणाछत्र धरून उपसर्ग दूर केले. त्यावेळीं चार घातिकर्मांचा पूर्ण क्षय होऊन त्यांना केवलज्ञान प्राप्त झाले.

धर्मामृतमयीं वृष्टिं कृत्वा भव्येषु निर्वृतः ।
तं पार्श्वं तापकुच्छेत्तमाश्रयं पर्युपास्महे ॥ ३० ॥

भव्य जीवावर धर्मामृताची वृष्टि करून जे निर्वाणाला गेले त्या पार्श्वनाथांची आम्ही भवतापनिवारण साठीं उपासना करतो.

१ निजदीक्षावन २ आकाशे विमानस्खलनात् ३ वेगवद्भिः ४ संवरज्योतिष्कामरेण उपद्रुतः ।

**मरुभूतिरशनिघोषः साहस्रारोऽथ योऽग्निवेगोऽच्युतजः ।**
**वज्रोऽहमिन्द्र आनन्द आनतेन्द्रो भजेऽथ पार्श्वजिनम् ॥३१**

मरुभूति, अशनिघोष, सहस्रारस्वर्गातील देव, विद्याधर, अच्युतस्वर्गातील देव, वज्रनाभिचक्रवर्ती, ग्रैवेयकात अहमिंद्रदेव, आनंदराजा, आनत स्वर्गात देवेंद्र इतकी भवावली भोगून आलेल्या पार्श्वनाथ तीर्थंकराचे आम्ही भजन करतो

**कमठ कुक्कुटसर्पः पञ्चमनरकी शयुस्तम क्षितिज ।**
**व्याधोऽधोगः सिंहो नरकी नरपोऽथ सम्बरः श्रितदृक् ॥३२**

कमठ, कुक्कुटसर्प, पाचव्या नरकातील जीव, अजगर, भिल्ल, सहाव्या नरकातला नारकीजीव, सिंह, नरकीजीव, महीपाल राजा इतके भव भोगून शेवटी सवरदेव आल्यावर तो जीव सम्यक्त्वधारी झाला.

**इति श्रीपार्श्वनाथस्य त्रयोविंशम् ॥ २३ ॥**

---

**सार्थेऽत्र पुष्कलावत्यां भिल्लास्ते मधुके वने ।**
**मुनिं सागरसेनाख्यं भ्रमन्तं दिग्विमोहतः ॥ १ ॥**

जम्बूद्वीपात विदेहक्षेत्रात पुष्कलावती देशातील मधुकवनात पुरुरवा नावाचा भिल्ल रहात होता. भिल्लानी व्यापाऱ्याचा ताडा इकडे तिकडे पळविला. पुढे एकदा सागरसेन नामक मुनि विहार करीत करीत त्या वनात वाट चुकून आले.

१ वज्रनाभिः २ सप्त० नरकजः ३महीपालराजा ४ श्रीपार्श्वनाथसमीपे गृहीतसम्यक्त्व. ५ भिल्लैरित स्तन क्षिप्ते ६ पुण्डरीकिण्यासंबोधनि ।

**हन्तुकामो मृगं मत्वा व्याधराजःपुरूरवाः।**
**इमे देवाश्चरन्तीति निषिद्धो निजभार्यया ॥ २ ॥**

एखादे हरिण समजून मुनिस पुरुरवा भिल्लाने बाण लावला. पण त्याच्या कालिका नामक भार्येने ते देव आहेत बाण मारूं नका ह्मणून त्याला रोकलें.

**शान्त्वा ततः स मध्वादित्रयत्यागव्रतं श्रितः।**
**गत्वा सौधर्ममेत्याभून्मरीचाख्य.सुतोऽग्रणीः ॥ ३ ॥**

मुनींची भेट झाल्यावर त्यांनीं धर्मबोध केला. त्याचा त्याचे मनावर फार परिणाम होऊन त्याने मद्य वगैरेचा त्याग केला. या व्रतामुळे तो मेल्यावर सौधर्म स्वर्गांत देव झाला. तेथून तो अयोध्येंत भरतराजाला अनतमति राणीपासून मरीचि नांवे करून पुत्र जन्मला.

**भरतेशानन्तमत्योःपुरुणासह दीक्षितः।**
**परीषहार्दितो गृह्णन्फलवल्कादे स स्वयम् ॥ ४ ॥**

ऋषभदेवाबरोबर त्यानेहि दीक्षा घेतली होती. पण कठोर परिग्रह सहन न झाल्यामुळें तो स्वतः फळे खाऊं लागला, व वल्कले नेसू लागला.

**नैर्ग्रन्थ्यनिन्द्यमेतत्त्वस्त्वेदं वेषान्तरं श्रय।**
**इत्यादिष्टो देवताभिः पारिव्राजकतामधात् ॥ ५ ॥**

---

१ कालिकाख्यया २ शिखाचिह्नकमंडलुधारणादिलक्षण. दीक्षा।

निर्ग्रंथपणाला ह्मणजे दिगंबरत्वाला हें आचारण निंदास्पद आहे ह्मणून तू वेषांतर कर असें देवतांनीं सांगितल्यावर त्यानें परिव्राजक वेष धारण केला.

तेनार्हतोऽपि सद्धर्मं किं तु दर्पात्तमोद्धत् ।
तपोभिः साङ्ख्यतत्वानि कापिलादीनजिग्रहत् ॥ ६ ॥

ऋषभतीर्थंकरापासून दीक्षा घेतली असूनहि तो तें व्रत पाळूं शकला नाहीं. सद्धर्म सोडून त्यानें सांख्य नामक मिथ्यात्व-मत गर्वानें सुरू केलें व कपिलादि अनेक तपस्वी त्याचे शिष्य झाले.

एवं ब्रह्मामर सोऽभूद्द्विजोऽत्र जटिलोऽनैयः ।
सौधर्मदेवो यः पुष्पमित्रसौधर्मनाकतः ॥ ७ ॥

पुढे तो मेल्यानंतर पांचव्या स्वर्गांत देव झाला. तेथून अयोध्या नगरींत कपिल ब्राह्मणास कालीपासून जटिल नामक पुत्र झाला. तोहि लवकरच परिव्राजक बनला व मेल्यानंतर सौधर्म स्वर्गांत देव झाला. नंतर स्थूणागार नगरींतील भारद्वाज ब्राह्मणास पुष्पदन्ता स्त्रीपासून तो पुष्पमित्र नावानें पुत्र जन्मला. त्यानेंहि परि-व्राजक दीक्षा घेतली व मेल्यावर तो सौधर्म स्वर्गांत देव झाला.

विप्रोऽथाग्निसहःसानत्कुमारश्चाग्निमित्रकः ।
ततो माहेन्द्रजो भूत्वा भारद्वाजोऽथ तद्द्युजः ॥ ८ ॥

१ आदिनाथमुपसद्य दर्पान्मानोदयात्त सद्धर्मं तेन सद्धर्मेण स्पर्द्धते स्म २ पूर्वं तपो ग्राहयित्वा ३ न्यायरहित. मिथ्यादृष्टिः ४ तद्द्युजः माहेंद्र स्वर्गजः ।

तेथून तो सूतिका नगरींतील अग्निभूतिनामक ब्राह्मणास गौतमीपासून अग्निसह नावाने पुत्र झाला. परिव्राजक दीक्षा घेऊन मेल्यावर तोहि सनत्कुमार स्वर्गात देव झाला. पुढे मंदिर नगरातील गौतम ब्राम्हणास तो कौशाबीपासून अग्निमित्र नावानें झाला. व परिव्राजक बनून मेल्यावर माहेंद्र स्वर्गांतदेव झाला. पुढें त्याच नगरींत सालंकायन ब्राम्हणास मंदिरा स्त्रीपासून भारद्वाज नामक पुत्र झाला. त्रिदंडी दीक्षा घेऊन त्याने खूब तपश्चर्या केली. मेल्यावर तो माहेंद्र स्वर्गात देव झाला.

ततस्त्रसस्थावरेषु सर्वश्वभ्रेषु चोत्कटम् ।
कष्टं स्थावरविप्रःसन्माहेंद्रं प्राप पूर्ववत् ॥ ९ ॥

नंतर त्या जीवाने त्रस व स्थावर योनींत अनेक जन्म घेतल्यावर तो राजगृही नगरीत शांडिल्य ब्राह्मणास पाराशरीपासून स्थावर नावाने जन्मला. परिव्राजक बनून मेल्यावर तोहि माहेंद्र स्वर्गांत देव झाला.

विश्वनन्द्यथ नार्पत्यो भूत्वा निर्ग्रन्थदीक्षया ।
महाशुक्रं गतोऽथाभूत्त्रिपृष्ठोऽथान्त्यनारकः ॥ १० ॥

पुन्हा मगधदेशात राजगृहीचा राजा विश्वभूति व राणी जैनी याच्या पोटीं विश्वनंदी नावाने जन्मला. त्याने दीक्षा घेतली व गायींचा धक्का लागून मेल्यावर महाशुक्रस्वर्गात वैमानिक

---

१ नृपति पुत्रः

देव झाला. तेथून तो पोदनपुरचा राजा प्रजापति व राणी मृगावती याच्या पोटीं त्रिपृष्ट नावाने जन्मला.

सोऽथ सिंहोऽथ धार्मोऽत सिंहो योऽभूत्स जात्वदन् ।
किञ्चिन्मृगमवष्टभ्य सहामितगुणेन खे ॥ ११ ॥
यतांजितञ्जयेनैनं दृष्ट्वैवं तीर्थनाथतः ।
स्मृत्वोपेत्य तमध्यास्य शिलामेवमुवाच स ॥ १२ ॥

त्रिपृष्ट अर्धचक्रवर्तीने बरेच वैभव भोगल्यावर मरून तो सातव्या नरकात गेला तेथून सिंहयोनीत जन्मला. पुन्हा नरकात गेला व पुन्हा सिंह झाला. तेथे तो एकदा एक हरिण मारून खात असता अजितजय नामक चारण मुनि आले व त्यांनीं त्याला शिलेवर बसून खूब धर्मबोध केला. तेव्हा सिंहाला पूर्वभवाचे ज्ञान झाले.

भो मृगेन्द्र ! त्रिपृष्टः सन्भुक्त्वा सौख्यं विकर्मतः ॥
प्राप्त श्वाभ्रञ्च यद्दुःख तन्न स्मरसि यत्पुनः ॥ १३ ॥

मुनि ह्मणाले. हे मृगेंद्रा, त्रिपृष्ट अर्धचक्रवर्तीच्या भवात पापकर्मानें तूं भोगलेले विषयसुख विसरलास काय ? त्या पापामुळे तुला नरकातील दुःख भोगावे लागलें हेंहि विसरलास काय ?

दुःखायांहश्च भोः कुर्वन्नीदृक्कर्माग्रपापभृत् ।
सद्यो जातिस्मरो भूत्वा तत्त्वश्रवणसिद्धया ॥ १४ ॥

---

१ गच्छता २ सिंह प्रत्युवाच ३ भवति भविष्यति.

इतके दुःख भोगले असूनहि तूं पुन्हा पापोपार्जन करणारे असलें हे हिंसाकर्म का करीत आहेस ? मुनीचे हे वचन ऐकून त्याला पूर्वभवाचे स्मरण झाले व शुद्धबुद्धीने त्याने तत्वज्ञान ऐकले.

**वेपमानो गलद्बाष्पःशुचा सोऽभूत्तदेव हृक् ।**
**विलोक्यैष शुभान्वेषीत्याहैवं स यतिः पुनः ॥ १५ ॥**

तत्वज्ञान ऐकून तो अश्रू ढाळू लागला व त्याचे अंग कापूं लागले. हें पाहून त्याचे शुभ इच्छिणारा मुनि त्याला पुन्हा ह्मणाला.

**मुञ्च धीमन्महापापं भज शीलं जगन्नुतम् ।**
**जहीहि क्रोधशत्रूंश्च क्षेमं चेदाप्तुमिच्छसि ॥ १६ ॥**

हे सुज्ञ सिंहा, तुला जर कल्याणाची इच्छा असेल तर हे हिंसेचे महापाप सोड, जगद्वंद्य असे शील धारण कर व क्रोधादि कषायरूपी शत्रूंचा त्याग कर.

**ततो मुनीन्द्रवाक्यानि श्रुत्वा ध्यात्वा जिनं हृदि ।**
**तत्त्वश्रद्धानमासाद्य सद्यःकालादिलब्धितः ॥ १७ ॥**

मुनीचा उपदेश ऐकून व जिनेंद्राचे स्मरण व ध्यान करून त्या सिंहाने कालादिलब्धि प्राप्त करून सम्यक्त्व धारण केले.

**प्रणिधाय मुहुश्चित्तं श्रावकाणुव्रते सुधीः ।**
**मृत्वा सौधर्मकल्पेऽसौ सिंहकेतु सुरोऽजनि ॥ १८ ॥**

त्या सुज्ञ सिंहाने श्रावकाणुव्रतात मन स्थिर केल्यामुळे मेल्यानंतर तो सौधर्म स्वर्गात सिंहकेतु नामक देव झाला.

सुखं भुक्त्वा ततश्च्युत्वा धातकीखण्डभाव्यभूत्।
खगाद्रौ मंगलावत्यां खेचरः कनकप्रभोः ॥ १९ ॥

स्वर्गसुख भोगून तेथून तो जीव धातकीखंडात पूर्वमंदराचलाचे पूर्वेस विदेहक्षेत्रात मंगलावती देशांतील विजयार्ध पर्वताच्या उत्तर श्रेणीवर कनकप्रभनगराचे राजा कनकपुंख विद्याधर व राणी कनकमाला यांच्या पोटीं कनकोज्ज्वल नावाने पुत्र जन्मला.

कनकोज्ज्वलनामासौ रन्तुं मेरुं गतो मुनेः।
श्रुत्वा प्रियमतेर्धर्मं तपः श्रित्वाऽगलान्तवम् ॥ २० ॥

कनकोज्ज्वल कनकवती नामक भार्येसह मंदराचल पर्वतावर क्रीडा करीत असता त्याला प्रियमित्र नामक अवधिज्ञानी मुनींचे दर्शन झाले त्याच्याकडून धर्मबोध श्रवण करून त्याने दीक्षा घेतली व तप आचरून मेल्यावर तो लान्तवस्वर्गांत सदानंद नामक देव झाला.

सदानन्दोऽभवत्तस्माच्च्युत्वास्मिन्कोशलाधिपः ॥
हरिषेणो महाशुक्रे जातः प्रीतिङ्करो व्रतात् ॥२१॥

तेथून तो कोशलाधिप वज्रसेन व राणी शीलवती यांच्या पोटीं हरिषेण नावाने जन्मला. वैराग्य उत्पन्न झाल्यावर दीक्षा घेऊन त्यानें तप आचारले व मेल्यावर तो महाशुक्र नामक स्वर्गात गेला व प्रीतिकर नामक देव झाला.

च्युत्वा प्राग्धातकीखण्डे पुष्कलावत्यशेषभुक् ॥
प्रियमित्रः सहस्रारे सोऽभूत्सूर्यप्रभस्ततः ॥ २२ ॥

१ अशेषभुक्चक्री

तेथून तो धातकी खंडात विदेह क्षेत्रात, पुष्कलावती देशांतील पुंडरीकिणी नगरीचा राजा सुमित्र व राणी सुव्रता याचे पोटीं प्रियमित्र नावाने जन्मला. चक्रवर्तीचे वैभव वरीच वर्षे भोगून त्यानें दीक्षा घेतली व मेल्यावर तो सहस्रार स्वर्गात सूर्यप्रभ नामक देव झाला.

छत्राकारपुरे भूत्वा स नन्दाख्योऽत्र दीक्षितः ॥
प्रौष्ठिलाच्चास्य बद्ध्वान्त्यं जात पुष्पोत्तरेऽच्युते ॥२३॥

जंबूद्वीपातील छत्रपुरचा राजा नंदिवर्धन व राणी वीरवती याना नंद नावाने तो पुत्र झाला. वरेच सुख भोगल्यावर त्याने प्रौष्ठिल मुनिजवळ दीक्षा घेतली व सोळा भावनाचे चिंतन करून तीर्थंकर नामकर्म बांधले. समाधिमरण साधल्यानंतर तो सोळाव्या स्वर्गांत पुष्पोत्तर विमानात इंद्र झाला.

च्युत्वा विदेहनाथस्य सिद्धार्थस्याङ्गजोऽजनि ॥
सोऽत्र कुण्डपुरे शक्रः कृत्वाभिषवणादिकम् ॥२४॥

तेथून च्यवन पावून तो विदेहदेशातील कुंडपुराचा राजा सिद्धार्थ व राणी प्रियकारिणी याच्या पोटीं महावीर नामे करून जन्मला. इंद्राने अभिषेकादि देवकृत्ये केलीं.

वीरः श्रीवर्द्धमानश्चेत्यस्य नामद्वयं व्यधात् ॥
स्वस्यायं संशयो यस्माज्जन्मानन्तरमीक्षितात् ॥२५

१ प्रियकारिणीगर्भे २ अच्युतेन्द्र ३ आत्मनो मुने ।

वीर व वर्धमान अशी त्याची दोन नावे ठेवली गेली. जन्मा नंतर त्याना पाहताच जयसेन व विजयनामक दोन चारण मुनींचे संशय दूर झाले.

निवृत्तो जयसेनाभ्रचारिणा विजयेन च ।
तत्त्वेष सन्मतिर्देव इत्युक्त प्रमदादसौ ॥ २६ ॥

तेव्हा त्याना सन्मति असे नाव ठेऊन ते दोघे चारण मुनि आनदाने परत गेले.

वीर शूरोऽधुनेत्युक्ति सुराणामिन्द्रसंसदि ।
श्रुत्वा सङ्गमकोऽन्येद्युरागतरतं परीक्षितुम् ॥२७॥

महावीरच हल्लीं खरा शूर आहे अशी चर्चा इंद्रसभेत झाले-ली ऐकून सगम नामक कोणी देव त्याची परीक्षा करण्यासाठी गेला.

दृष्ट्वा क्रीडन्तमुद्यानेऽगमोरुढो नृपात्मजैः ।
काकपक्षधरैः सार्धं सवयोभिर्महाफणी ॥ २८ ॥

इतर राजकुमारासह बगीचातील झाडावर जावळ राखलेले राजपुत्रासह महावीर खेळत असलेले पाहून तो देव महासर्प बनला.

भूत्वा वेष्टितमास्कन्धादस्थात्तद्भयतोऽखिला ।
विटपिभ्यो निपत्याशु राजपुत्राःपलायिताः ॥ २९ ॥

त्या महासर्पाने झाडाच्या बुंध्याला विळखा घातलेला पाहून भ्यालेले राजकुमार फांद्यावरून उड्या मारून पळून गेले.

१ गतः २ हर्षात् ३ सुराणामुक्तिं ४ वृक्ष ५ स्थितः ६ सर्पः ७ वृक्षात् ८ भूमौ पतित्वा ।

**वीरोऽस्थादारुह्य भीष्मं मात्रंकेवदरीरमत्।**
**ततःप्रीतो महावीर इत्याख्यां तस्य सं व्यधात् ॥३०॥**

वीरजिन मात्र न भिता आईच्या माडीवर खेळण्याप्रमाणे त्या सर्पावर खेळूं लागले. तेव्हा खूष होऊन सगम देवाने त्याना महावीर म्हटले व तो निघून गेला.

**सोऽन्येद्युस्त्रिंशदब्दान्ते स्मृतपूर्वभवान्तरः।**
**वर्धिष्णुनिर्वेदरसो दीक्षित्वा धर्म्यमध्यगात् ॥ ३१ ॥**

पुढे तीस वर्षे वयास झाल्यावर महावीराना पूर्वभवाचें स्मरण झाले व वैराग्य वाटून त्यानी दीक्षा घेतली व धर्मध्यान चालविलें.

**रुद्रो दुर्गालुंगो धौष्ट्यात्सं श्मशानेऽतिमुक्तके।**
**कदाचित्प्रतिमायोगमाश्रितं वीक्ष्य दुष्टधीः ॥ ३२ ॥**

विहार करीत करीत ते एकदा अतिमुक्तक श्मशानात येऊन प्रतिमायोग धारण करून बसले असता दुर्गेसह रुद्राने दुष्टपणा सुरू केला.

**योगाद्ध्वंसयितुं घोरध्वंतालाहीन्द्रकुञ्जरान्।**
**किरातसैन्यरूपाणि वाताग्न्यादींस्तथा निशि ॥३३॥**

आपल्या योगवलाने रुद्रदेवाने अंधेर पसरविला. वेताल देवाना अक्राळविक्राळ रूप देऊन ताडवनृत्य करण्यास पाठविले. भयंकर सर्प, मदोन्मत्त हत्ती निर्माण केले. अग्नि पेटविला. सोसाट्याचा वारा सुरूं केला. प्रचंड किरात सैन्य धाडले.

---

१ मातुरुत्संग २ क्रीडयामास ३ संगमदेवः ४ धर्म्यध्यानं ध्यायतिस्म ५ पार्वतीसहितः।

विद्याबलात्प्रकृत्येष मनो विक्षप्तुमक्षमः ।
एवं महतिमहावीरोऽसीत्युक्त्वास्तौन्मुदानटत् ॥३४॥

या सर्वांनी महावीरांना पुष्कळ उपसर्ग केले. पण तपोविधिच्या जोगावर महावीरांनी आपले मन किंचितहि विचलित होऊ दिले नाहीं. हे पाहून तुम्ही महतिमहावीर आहा असे म्हणून रुद्राने प्रभूची आनंदाने नाचून स्तुति केली.

कन्यां चेटकराजस्य चन्दनां श्राविकां वने ॥
क्रीडन्तीं वीक्ष्य कामार्तो हृत्वा कश्चित्खगोऽव्रजत् ॥

चेटक राजाची मुलगी चंदनाश्राविका वनक्रीडा करीत असतां तिला पाहून कामार्त झालेला एक विद्याधर तिला पळवून नेत होता.

स्वपत्नीभीपितोऽमुञ्चन्महाटव्यामवाप्य ताम् ॥
पल्लीशात्स्वसखान्नीत्वा कौशाम्बीमार्पयद्धनेट् ॥३६॥

इतक्यात त्याची बायको आल्यामुळे विद्याधराने तिला रानातच सोडले. कालक नामक भिल्लाला तिने आपले डागिने दिले आणि धर्मोपदेश केला. त्या भिल्लानें तिला भिल्लनामक भिल्लराजाला देऊन टाकले. भिल्लराजाने वृषभसेन सावकाराच्या मित्रवीरनामक नोकराच्या ती स्वाधीन केली. त्याने ती वृषभसेन सावकाराच्या स्वाधीन केली.

१ समाधेः स्खलयितुं २ सिंधु देश विशालनगरस्य ३ मनोवेगः ४ श्रेष्ठिन एव वनेऽर्पयत् ।

**एनां वृषभसेनस्य प्रेष्यस्यापि स्त्रयोषितः ॥**
**सोऽपि[2] स्वकान्तसम्पर्कशंङ्किनी[3] श्रृङ्खलासिता[4] ॥३७॥**

शेठनें तिला आपल्या बायकोची दासी ह्मणून ठेवलें पण शेटजीचा तिच्याशी संभोग घडेल या भीतीनें तिनें चंदनेला बेड्या घालून कैदेत ठेविले.

**शरावस्थसधान्याम्लजीर्णकोद्रवदित्सया ॥**
**तामबाधयदन्येद्युर्वीक्ष्य चर्यासमागतम् ॥ ३८ ॥**

तिला ती मडक्यातून कोद्रूचा भात पेजेतून खायाला देत असे. एकदा त्याच गावी भिक्षेसाठीं महावीर आले.

**वीरं प्रत्युद्यती भक्त्या सद्योगलितश्रृंङ्खला ॥**
**दिव्यभूषाम्बरा केशच्युतपुष्पाश्चितक्षितिः ॥ ३९ ॥**

महावीर स्वामीचे भक्तीने स्वागत करीत असतां तिच्या शृखला तुटल्या. तिचीं वस्त्रे दिव्य झाली. केस सुशोभित झाले. केसातून पुष्पें जमिनीवर गळून ती सुंदर दिसू लागली.

**स्वीकृत्यं शीलमाहात्म्याद्धेमीभूतशरावगम् ॥**
**क्षीरशाल्योदनीभूत तत्स्वमक्तमभोजयत् ॥४०॥**

शीलमाहात्म्यामुळे मडके सोन्याचे झाले. कोद्रूचा भात खीर झाला व त्याचा स्वीकार महावीरानीं केला.

---

१ सार्थवाह भृत्यस्य वृषभसेनाम्नः २ भद्रा व्याया अर्पयत् ३ भद्रा ४ बद्धा ५ अभ्युतिष्ठन्ती उद्यमपूर्वकम् श्री वीरसन्मुख गच्छती ६ विधिना प्रतिग्रह्यः ॥

पञ्चाश्चर्याण्यतःप्राप्य संयोगश्च स्वबन्धुभिः ॥
निर्विघ्नात्तव्रता साग्रगणिनींद्रार्चिताभवत् ॥ ४१ ॥

पाच आश्चर्ये निर्माण झाली. आप्तेष्टाकडे ती गेली. पण वैराग्य उत्पन्न होऊन तिनें अर्जिकेची दीक्षा घेतली तेव्हा तिची इंद्रान पूजा केली.

छद्मस्थं स द्विषड्ब्दो ऋजुकूलातटे स्थितः ।
शुक्लध्यानेन घातीनि निहत्यार्हन्त्यमासदत् ॥ ४२ ॥

पुढें महावीर बारा वर्षे विहार करून ऋजुकूलानदी तीरीं शुक्लध्यानस्थ बसले असता त्याच्या चारी घातिकर्मांचा नाश झाला व ते अर्हत्पदाला गेले.

ज्ञात्वा दिव्यध्वनेर्हेतुं तस्येन्द्रो वेदपारगम् ।
जातं गौतमगोत्रेऽर्कविमानादेत्य गौतमात् ॥ ४३ ॥

त्यावेळीं दिव्यध्वनि होण्याचें कारण ओळखून इंद्र गौतम गावीं विद्यापारगत गौतम गोत्राच्या इद्रभूमि नामक ब्राह्मणाकडे गेला. इद्रभूति आदित्य विमानातील देवगतींतून तेथें जन्मला होता.

ग्रामादुपायेनानीय सार्द्धं पञ्चशतद्विजैः ।
तपो नीत्वा वधित्वाधान्निन्द्रभूतिं गणाधिपम् ॥४४॥

पाचशे ब्राम्हणासह इद्रभूतीला त्या गावातून आणण्यात आलें.

१ दानात् २ भाविनि भूतवदुपाचारः भविष्यतीत्यर्थः ३ छद्मस्थभावेनातिक्रांतद्वादशवर्षः ४ भगवतः ५ पञ्चमस्वर्गात्सूर्यविमानादागत ६ गौतमनाम्नः श्रेणिकग्रामात् ७ बटुकवेषादिलक्षणेन ।

त्याने महावीरांना शंका विचारल्या व त्याचे समाधान झाल्यामुळें त्यानें दीक्षा घेतली व पाप कर्माचा नाश करणारे तप आचरिले तेव्हां तो इंद्रभूति गणधर झाला.

**किञ्चिदूनशरत्रिंशद्भुक्त्वार्हन्त्यपदःपदम् ।**
**परं प्राप्तो महावीरः स दिश्यान्नः परं पदम् ॥४५॥**

तीस वर्षांना काहीं कमी दिवस अर्हंत पद भोगून जे सिद्ध पदाला गेले ते महावीर आम्हालाहि श्रेष्ठ पद देवोत.

**मद्यमांसमधुत्यागात्सौधर्मं स पुरूरवाः ।**
**द्यां मरीचिर्दिवीभूय षड्वारान्साङ्ख्यतो गतः ॥४६**

पुरूरवा भिल्ल मद्य, मांस व मधाचे त्यागामुळे सौधर्मस्वर्गाप्रत गेला. तेथून मरीचि होऊन देव झाला व सहा वेळा सांख्य मताचा ब्राम्हण झाला.

**ततस्त्रसस्थावरेषु क्लिष्ट्वा सांख्यो द्विजोऽभवत् ।**
**स्वर्गत्वा विश्वनन्दी सन्नपि निर्ग्रन्थदीक्षया ॥ ४७ ॥**

नंतर अनेक त्रस व स्थावर योनींत जन्म घेऊन तो सांख्य मताचा ब्राम्हण झाला. पुढे स्वर्गांतील देव होऊन विश्वनंदी झाला.

**त्रिपृष्टोऽन्त्यश्वभ्रासिंहो धर्मभूय ततःश्वसनं ।**
**सिंहोऽथ श्रावकत्वेनाद्यकल्पेऽथ ततःखगः ॥ ४८ ॥**

नंतर देवगतींतून त्रिपृष्ट झाला. पुढे नरकगतींतून सिंह झाला व मग देव होऊन विद्याधर झाला.

---

१ विद्यमानः ।

लांतवं हरिषेण:सन्महाशुक्रे ततोऽभवत् ॥
प्रियमित्र: सहस्रारं नन्द: सन्नच्युतेन्द्रताम् ॥ ४९ ॥

देवगतींतून च्यवून हरिषेण झाला. पुन्हा देव होऊन प्रियमित्र झाला. नंतर सहस्रार स्वर्गात जाऊन नंद झाला व मग अच्युत स्वर्गात इंद्र झाला.

ततश्च्युतो विरज्यात्तसंयमःप्राप्य केवलम् ।
तीर्थकृद्भूय यःसिद्धो महावीरं नमामि तम् ॥ ५० ॥

तेथून च्यवून जो महावीर झाला व वैराग्य पावून दीक्षा घेतल्यावर तपाचरण करून ज्याला केवलज्ञान झाले व ज्याने धर्मतीर्थ प्रवर्तन करून सिद्धपद मिळविले त्याला मी नमन करतो.

गणभृत्पूर्वधृत्सत्यैसंयमावधिसत्त्विष ।
विक्रियर्द्धीश्वरास्तुर्यज्ञानिनःकेवलेक्षणाः ॥ ५१ ॥
वादिनश्चार्यिका येषां श्राविकाः श्रावका गणे ।
देवादेव्यश्च तिर्यंचस्तान्नुमस्तीर्थनायकान् ॥ ५२ ॥

गणधर, चौदापूर्वांचे धारक, सामान्यमुनि, अवधिज्ञानी, विक्रियाधारक मुनि. मन:पर्ययज्ञानी, केवलज्ञानी ज्यामध्यें आहे असा संघ व ज्याच्या संघात वादपटु मुनि व आर्यिका श्रावक व श्राविका, देवदेवी व तिर्यंच प्राणी आहेत त्या तीर्थकराना मी नमन करतो.

इत्याशाधरदृब्धे त्रिषष्टिस्मृतिनाम्नि महापुराणांतस्तत्वसङ्ग्रहे श्रीमहावीरपुराणं चतुर्विंशम् ॥

---

१ शैक्षक २ संघे विद्यते.

## ॥ अथ प्रशस्तिः ॥

श्रीमानस्ति सपादलक्षविषयः शाकम्भरीभूषणः ॥
तत्र श्रीरतिधाम मण्डलकरं नामास्ति दुर्गं महत् ॥
श्रीरत्न्यामुदपादि तत्र विमलव्याघ्रेरवालान्वयो ॥
च्छ्रीसल्लक्षणतो जिनेन्द्रसमयश्रद्धालुराशाधरः ॥ १ ॥

धर्म, अर्थ व काम या तीन्ही संपत्तींनी भरपूर असा शाकं-भरीभूषण सपादलक्ष नामक देश आहे. त्या देशांत रतिधाममंडल-कर नामक मोठा किल्ला आहे. तेथे शुद्ध अशा व्याघ्रेवाल वंशाच्या श्रीमान् लक्षणशाहना श्रीरत्नीच्या पोटी जिनशासनानुरक्त असे आशाधर पंडित जन्माला आले.

सरस्वत्यामिवात्मानं सरस्वत्यामजीजनत् ॥
यः पुत्रं छाहडं गुण्यं रंजितार्जुनभूपतिम् ॥ २ ॥

सरस्वतीच्या पोटी हा पंडित जसा झाला तसा त्यानेंहि सरस्वतीनामक भार्येच्या पोटी छाहड नामक पुत्राला जन्म दिला. त्यानें अर्जुनराजाला आपल्या गुणाने मग्न केले.

म्लेच्छेशेन सपादलक्षविषये व्याप्ते सुवृत्तक्षति-।
त्रासाद्विन्ध्यनरेन्द्रदोःपरिमलस्फूर्जत्त्रिवर्गौजसि ॥
प्राप्तो मालवमण्डले बहुपरीवारः पुरीमावसन् ॥
यो धारामपठज्जिनप्रमितिवाक्शास्त्रे महावीरतः ॥३॥

१ त्रिवर्गसंपत्तियुक्त २ लक्षणसाह् कवेः पितुर्नाम।

म्लेच्छराजाने सपादलक्षनामक देश पादाक्रांत केल्यावर उपजी-विकेला हरकत पोहोचल्र या त्रासाने विंध्यनरेंद्राच्या आश्रयाखालील मालवदेशातल्या धारा नगरीत येऊन महावीरापासून जैनेन्द्रव्या-करण व जैनन्याय या जिनशासनाचे वाचन करीत राहिले.

श्रीमदर्जुनभूपालराज्ये श्रावकसंकुले ॥
जिनधर्मोदयार्थं यो नलकच्छपुरेऽवसत् ॥ ४ ॥

श्री अर्जुनदेवाच्या राज्यातील श्रावकवर्गांत जिनधर्माचा उदय करण्यासाठी ते नलकच्छपुरात राहिले.

योद्राग्व्याकरणाब्धिपारमनयच्छुश्रूषमाणान्नकान् ॥
पट्तर्कीपरमास्त्रमाप्य नयत प्रत्यर्थिनः केऽक्षिपन् ॥
चेरुः केऽस्खलितं न येन जिनवाग्दीपं पथि ग्राहिताः ।
पीत्वा काव्यसुधां यतश्च रसिकेष्वापुःप्रतिष्ठां न के ॥

त्याने कोणत्या विद्यार्थ्यांना व्याकरणरूपी समुद्राचे पलीकडे नेले नाही बरे ? पट्तर्कीपरमअस्त्र त्याच्याकडून लाभल्यामुळे कोणी प्रतिपक्षावर प्रहार केले नाहीत ? त्याने जिनवाणीचा दीप राजमार्गावर लावल्यामुळे कोण विनधोक वागू लागले नाहीत बर ? त्याची काव्यसुधा पिऊन रसिकामध्ये कोणी बरें प्रतिष्ठा मिळविली नाहीं.

धर्मामृतादिशास्त्राणि कुशाग्रधियामिव ।
यःसिद्ध्यंकं महाकाव्यं रसिकानां मुदेऽसृजत् ॥६॥

कुशाग्रबुद्धीचीं द्योतक धर्मामृतादि शास्त्रे व रसिकांच्या प्रमोदासाठीं सिध्यंका महाकाव्य ज्याने रचिले.

**सोऽहमाशाधरः कण्ठमलंकर्तुं सधर्मणाम् ।**
**पञ्जिकालंकृतं ग्रन्थमिमं पुण्यमरीरचम् ॥ ७ ॥**

त्या मी ह्या आशाधर पंडिताने धार्मिकांचे कंठ भूषित करण्यासाठीं हा पावन ग्रंथ रचला.

**क्वार्षमब्धिः क्व मद्धीस्तैस्तथाप्येतत्कृतं मया ।**
**पुण्यैःसद्भ्यःकथारत्नान्युद्धृत्य ग्रथितान्यतः ॥ ८ ॥**

आर्षवाङ्मयाचा सागर कोणीकडे व माझी अल्पबुद्धि कोणीकडे ! तथापि त्या पावनसागराचा मी स्पर्श केला व सज्जनांच्यासाठीं त्यांतून कथारत्ने काढून मी त्याचे ग्रथन केले.

**संक्षिप्यतां पुराणानि नित्यस्वाध्यायसिद्धये ।**
**इति पण्डितजाजाकाद्विज्ञप्तिः प्रेरिकात्र मे ॥ ९ ॥**

नित्य स्वाध्यायासाठी त्रेसष्टशलाका पुरुषांची पुराणे संक्षिप्त करून द्या अशी जाजाक पंडितानी केलेली प्रेरणाच या ग्रंथाला कारण झाली.

**यच्छद्मस्थतया किञ्चिदत्रास्तिस्खलितं मम ।**
**तत्संशोध्य पठन्त्वेनं जिनशासनभाक्तिकाः ॥ १० ॥**

जिनशासनभक्त चुकून जर माझ्या हातून काही स्खलन झाले असेल तर तें शुद्ध करून वाचोत.

---

१ मम मतिः २ प्रसिद्धैः पुण्यैः ३ श्रेयोर्थिजनार्थं ४ छद्मार्थे वा प्रमादः

महापुराणान्तस्तत्वसङ्ग्रहं पठतामिमम् ।
त्रिषष्टिस्मृतिनामानं दृष्टिदेवी प्रसीदतु ॥ ११ ॥

त्रिषष्टिस्मृतिनामक महापुराणातील हा अंतर्गत तत्वसंग्रह वाचणाऱ्यावर सम्यग्दृष्टि देवता प्रसन्न होवो.

प्रमारवंशवार्धीन्दुदेवपालनृपात्मजे ।
श्रीमज्जैतुगिदेवेऽसिस्थेम्नावन्तीमवत्यलम् ॥ १२ ॥

परमार वंशरूपी समुद्राला वृद्धिंगत करण्यास चंद्राप्रमाणे असलेला जो देवपाल राजाचा पुत्र जो जैतुगिदेव तो आपल्या तरवारीच्या सामर्थ्याने अवन्तीचे चांगले रक्षण करीत असता

नलकच्छपुरे श्रीमन्नेमिचैत्यालयेऽसिधत् ।
ग्रन्थोऽयं द्विनवद्व्येकविक्रमार्कसमात्यये ॥ १३ ॥

नलकच्छपुरातील नेमिनाथ मंदिरात हा ग्रंथ विक्रम संवत १२९२ मध्ये सिद्ध झाला.

खांडिल्यवंशे महणकमलश्री सुतः सदृक् ॥
धीनाको वर्धतां येन लिखितास्याद्य पुस्तिका ॥१४

ज्याने ही पहिली प्रत लिहिली त्या खांडिल्यवंशज महणकमल श्रीसुत धीनाकाची भरभराट होवो.

अलमतिप्रसंगेन—आता विस्तार पुरे.

१ त्रिषष्टिशलाकापुरुषपुराणार्थस्मरणार्थत्वात् २ सम्यक्त्वदेवता ३ विशुद्धयतु प्रसन्ने हृदि प्रसीदतु वा अभिमतार्थप्रदास्तु । ४ निष्पन्नसंवत् १२९२ । ५ लघु महर्द्धिः सुनेत्रो वा.

**शान्तिःशन्तनुतां समस्तजगतां सङ्गच्छतां धार्मिकैः**
**श्रेयः श्रीपरिवर्द्धतां नयधुराधुर्यो धरित्रीपतिः ॥**
**सद्विद्यारसमुद्गिरन्तु कवयो नामाप्यघस्यास्तु मा ॥**
**प्रार्थ्यं वा कियदेक एव शिवकृद्धर्मो जयत्वर्हतः १५**

सर्व जगात शांतिनाथजिन शांति व कल्याणाची वृद्धि करोत. धार्मिकाबरोबर पुण्याची वृद्धि होवो. न्यायनीतीत अग्रेसर असलेल्या पृथ्वीपतीचे वैभव वाढो. कविजन सद्विद्येचा प्रसार करोत. पाप नावालाहि कोठें न राहो. दुसरे किती मागावे. कल्याणकारक अशा अर्हच्छासनाचा जयजयकार होवो.

इत्याशाधरविरचिता त्रिषष्टिस्मृतिः समाप्ता ।

